संगीत

# युद्धाच्या सांवल्या

## शेतकरी जीवनावर आधारलेलें सामाजिक नाटक


लेखक :

ग. दि. माडगुळकर



मुद्रक : श्रीपाद रघुनाथ राजगुरु,
राजगुरु प्रेस, ४०५ नारायण, कॉमनवेल्थ कॉलनी, पुणें २.

प्रकाशक : दयार्णव रघुनाथ कोपर्डेकर,
५२९ सदाशिव पेठ, पुणें २.

सोल एजंट :

ललितकलाकुंज, पुणें.





सन १९४४ ]



[ किंमत १ रुपया

# प्रस्तावना



या नाटकाचे कर्ते रा. माडगूळकर यांची आणि माझी प्रत्यक्ष ओळख नाहीं. परंतु त्यांच्या कांहीं कांहीं कविता मात्र मीं वाचलेल्या आहेत. त्यांची माझी ओळख झाली असती तर त्यांच्या धार्मिक आणि सामाजिक मतांचा तपशील काय आहे हें मला माहीत करून घेतां आलें असतें. परंतु तें होण्याचा आत्तांच्या आत्तां संभव दिसत नाहीं. यामुळें या नाटकासंबंधानें मला विशेष सविस्तर लिहितां येत नाहीं याचें वाईट वाटतें. माझे फार दिवसांचे मित्र प्रख्यात नट श्री. चिंतामणराव कोल्हटकर यांनीं प्रस्तावना लिहिण्याचें काम मला सांगितलें म्हणून मी तें करीत आहें.

रा. माडगूळकर यांनीं लिहिलेल्या या छोट्याशा नाटकानें लोकांची कांहीं वेळपर्यंत चांगल्या प्रकारची करमणूक होईल असें वाटतें. प्रस्तुत युद्धाच्या संबंधानें मराठा समाजांत विचाराची कोणची खळबळ चालू आहे हें या नाटकांत मुख्यत्वेंकरून दाखविलेलें आहे; आणि निरनिराळ्या मतपंथांतील चांगले चांगले विशेष एकत्र करून त्यांच्यांतील कडवटपणा घालविण्याचा यत्न नाटककारांनीं केला आहे तो बरा साधला आहे असें म्हणावयास हवें. तथापि या पुस्तकात मला जर एखादा ठळक गुण दिसून आला असला तर तो म्हणजे माडगूळकर यांची कुणबाऊ भाषा लिहिण्याची सफाई आणि तिच्या पोटांत दिसून येणारी श्री. माडगूळकर यांची काव्याची प्रतिभा हा होय. या भाषेच्या ठेवणीवरून नाटककर्ते हे देशावरील मराठ्यांच्या संगतींत बरेच घुसमटून वागलेले असावे असें वाटतें; आणि मराठा समाजाच्या एकंदर जीवितासंबंधानें त्यांच्या ठिकाणीं खरें खरें ममत्व वागत आहे असेंही दिसून येतें. अर्थात् लेखकाचें कवित्व कुणबाऊ पात्रांच्या तोंडीं प्रगट होत असल्या-मुळें तें लेखकाचें आहे आणि पात्रांचें नव्हे, असें अनेक ठिकाणीं सहज दिसून येतें आणि शहरांत सुरू असलेले अगदीं आजकालचे विचार खेड्यांतील शेतकरी लोकांच्या तोंडांत कांहीं वेळा अस्थानीं वाटतात. पण या दोषाकडे दुर्लक्ष केलें तरी चालण्यासारखें आहे. मुख्य म्हणजे त्यांनीं लिहिलेली मराठ-मोळ्याची भाषा फार सुंदर आहे आणि अवश्य त्या त्या ठिकाणीं त्या भाषेचें जें करड सौंदर्य आहे व तिच्या ठिकाणीं जो ठसकेदारपणा आहे तो जर त्या त्या पात्रांनीं यथायोग्य वठवून दाखविला तर हीं भाषणें रंगभूमीवर रसाचा

उठाव करणारी तर होतीलच, पण मधून मधून विनोदाची लकेरही उत्पन्न केल्याशिवाय रहाणार नाहीं. रा. माडगूळकर यांना सामाजिक सुधारणा प्रतिपादावयाची आहे असें समजून चाललें तर, एका मोठ्या विषयाला हात घालून तो वठविण्याचें काम मात्र त्यांनीं फार चुटपुटतें केलें आहे; आणि मराठा समाजाच्या स्वाभावसिद्ध गुणांचा त्यांना आविष्कार करावयाचा आहे असें धरून चाललों तर त्या आविष्काराला त्यांनी फार थोडा अवसर दिलेला आहे असें दिसून येतें. यामुळें या सर्व नाटकाला छोटेपणाचें आणि तात्पुरतेपणाचें रूप आलेलें आहे. कदाचित् रा. माडगूळकर यांचाही हेतु तोच असेल. कारण रंगभूमि अवजड बनूं न देण्याची कल्पना सध्यां रूढ झालेली दिसते आणि प्रेक्षक वर्गही निरनिराळ्या विवंचनांनीं सध्यां इतका व्यग्र आहे कीं, थोडाही अवजडपणा आणि थोडेंही गांभीर्य त्यांच्या मनाला शीण आणल्याशिवाय रहात नाहीं. ही सध्याची परिस्थिति लक्षांत घेऊन लेखकानें विषयाचा आवांका मोठा धरूनही त्याचा विकास मात्र अगदीं बेतशीर केला आहे असें वाटतें. असो. या एका गद्य लिखाणाच्या विसारावरून असें खरोखरच म्हणतां येतें कीं, रा. माडगूळकर यांच्या हातून चांगल्या तऱ्हेचें लिखाण यापुढें निपजत जाईल.

ता. १४ डिसेंबर, १९४४.
पुणें.

श्रीपाद महादेव माटे

या नाटकाचा प्रथम प्रयोग 'ललितकलाकुंज' या नाट्य-संस्थेनें रविवार ता. १७-१२-४४ रोजीं दुपारीं ५ वाजतां (नवीन वेळ) भानुविलास नाट्यमंदिरांत ( पुणें ) केला.



| | |
|---|---|
| ज्योति | चिंतामणराव कोल्हटकर |
| जिवबा | श्री. जोगळेकर |
| शिवबा | जयराम शिलेदार |
| छोटूमल | वसंत शिंदे |
| दिवाणजी | गोपाळ बकरे |
| माधवराव | श्रीपाद जोशी |
| नथ्थूमल | चित्तरंजन कोल्हटकर |
| बावऱ्या | रघुनाथ वाटवे |
| हरबा | बाळकृष्ण नोऱ्हाटे |
| सुभान्या | पांडुरंग गुळवणी |
| लीला : | कुमारी शालिनी देशपांडे |
| गौराई : | मा. दिनकर मंडलीक |



दिग्दर्शक— चिंतामणराव कोल्हटकर

संगीत दिग्दर्शक—बाबूराव बोरकर.



संगीत सहाय्यक :

शामराव बोरकर, ऑर्गन. पंडीत धर्माधिकारी, दिलरुबा.

मधुकर पन्हाळकर, फिडल्. रघुनाथ पीळगांवकर, तबला.

नेपथ्य : कृष्णा जी. ओगले. सीनसिनरी : रघुनाथ केशव केळकर.

# युद्धाच्या सांवल्या

## अंक पहिला

[ जिवबा शेतकऱ्याची शेतवाडी. उन्हें कलत चालली आहेत. जिवबाचा सुशिक्षित मुलगा शिवबा कुऱ्हाडीला धार लावीत बसला आहे. त्या नादांत तो खालील पोवाडा म्हणतो आहे. ]

**शिवबा**—माणदेशचा उमदा शाहिर आला भटकत दरबारां
नाट्यकलेच्या सूज्ञ रसीकते, घे पहिला मुजरा
सुखें गातसे तुळशीराम हा नव्या पिढीसाठीं
गद्यामधला नवा पवाडा नवीच ही धाटी
मनांत माझ्या बहरुनि आले शिवार हिरवें शब्दांचें
हिऱ्यामाणकापरी डंवरले पीक त्यावरी अर्थाचें
विहिरीमाजी जिता ओघ हा जुन्या कविंच्या प्रतिभेचा
मोटकरी मी केवळ येथें पाट झुळझुळे काव्याचा
चलाच क्षणभर आता माझ्या मळ्यांत घ्याया सहल जरा
खेडवळाचा कवळा हुरडा बघा चाखुनि रसिकवरा
बांधावरी या बसा जरासे पलाण देइल साथ बरी
त्या साथीवर घुमते नवख्या मोटकऱ्याची ललकारी

[ पोवाड्यानंतर तो मोटेवर जातो. मोट चालू होते. त्याची मोटेवरील ललकारी ऐकून नुकतीच आलेली लीला त्याच सुरांत नाचत-बागडत गाऊं लागते. ]

लीला— ललकार, ललकार
जिवलगा गीत तुझे ललकार
स्वरास्वरांतुन अशीच झरुं दे गोड मृगाची धार १

भिजुनि जाउं दे शिवार सारें
टाक भारुनी नवखें वारें
सहज भिजव या वनराणीचा वासंतिक शिणगार २

उन्हांत कलत्या पंख सुकवुनी
पानांआडुन कुणी पाक्षिणी
शीळ घालुनी तव गीताचा घुमविल जयजयकार ३

[ लीलेचें गाणें संपून ती आता मोटेच्या बाजूला वळणार इतक्यांत उलट्या दिशेनें लंगडा ज्योतिबा खांकरत खोकरत बाहेर येतो. लीला वळून पाहते. तिचा चेहरा किंचित् हिरमुसला होतो. ]

**ज्योति**—कावं चेहरा कां टाकलासा? कुक्कुट कोंबड्याचा आवाज झाला म्हून आवर्जून बघीतलसा अन् ह्यो म्हातारा कोल्हाच दिसला म्हून व्हय? ( हंसत ) शिवबा मोटंवर हाय! थांबा की वाईश्या! बोला जरा या म्हताऱ्यासंगं! ( निरखून ) अरारारा!!! नागएलीच्या पिकल्यापानावानी काय पिवळा फटफटीत चेहरा झालाय् व तुमचा लीलाक्का? म्हमई काय मानल्याली दिसत न्हाई!

**लीला**—( स्वतःला सांवरीत ) माझा चेहरा नाहीं पिवळा पडला ज्योतिकाका, तोंडावर पडलेली कलतीं उन्हंच पिवळसर दिसताहेत.

**ज्योति**—त्येबी खरंच! सरकारी दवाखान्यांत असतासा न्हवं म्हमईला? काय इपरीत काळ आनला या लढाईनं! चुलीम्होरल्या बायका सरकारांत शिरून नोकरी कराय् लागल्या बाप्यागत.

**लीला**—ती कां नौकरी? (हंसते) लोकांच्या उपयोगीं पडतां यावं म्हणून मी नर्सिंगचं शिक्षण घेत होतें एका हॉस्पिटलमध्यें!

**ज्योते**—असं! असं! मला काय कळतया एड्याला? आमचा शिवबा म्हनीता कीं तुमी सरकारी दवाखान्यांत डागदारीन हायसा, तवा म्हटलं! मग आतां सोडून आलासा न्हवं ती नोकरी? कवा आलासा कवा?

**लीला**—आज दुपारीं आलें. गांवांत कळलं कीं शिव...( लाजते )

**ज्योति**—बोला, बोला. मला म्हाताऱ्याला काय लाजतायसा? वडाचं खॉड अन् म्हातारं हाड सारखंच. त्येला काय भ्याचं अन् लाजायचं हाय! तवा गावांत तुम्हासनीं कळलं कीं शिवबा मळ्यांत हाय म्हनून?

**लीला**—आल्याबरोबरच निघणार होतें; पण उन्ह फार रखरखत होतीं म्हणून—

**ज्योति**—व्हय व्हय, आंदि बाईमानूस, त्यांतनं म्हमईचं. कदमाकदमावर टरामा मिळायच्या म्हमईला. हातं कवा तालुकाच्या आमलदार यील आवसं-पुनवेला तवा मोटर नंदरं पडायची.

**लीला**—आजकाल मुंबईला तरी काय ट्रॅममधून हिंडणं म्हणजे पाप झालंय पाप.

**ज्योति**—व्हय, व्हय, जिवाची 'म्हमई' करायचीबी सोय उरली न्हाई आतां. पेट्रोलावर कंट्रुल बसलाय् तेनं म्हमईच्या मोटारींचं खटारं झाल्यात अन् टरामांत ही गर्दी—वागरतं मेंढरं कोंडल्यावानी! बरं जागा तरी बीगीबीगी मिळतीया कां? रांगांत उभा राहून लंबर लागल तव्वा वर चढायचं. तें काय न्हवं बघा लीलाक्का; आपलं खेडंच ब्येस. लढाई न्हाई लढाईचा बा आला तरी आपल्या खटाऱ्याची कुन्नीची वांकडी हुयाची न्हाई, अन् झाली तरीबी बयत्याचा सुतार खिनभरांत ठाकठीक करून देतोय्. पेट्रोलाबिगार म्हमईच्या मोटारी लागल्यात गपापा कोळसं खायाला अन् कोळश्याबिगार मानसं लागल्यात उपाशी मरायला.

**लीला**—कांहीं तरीच. मुंबईचीं माणसं काय कोळसे खातात कीं काय?

**ज्योति**—आतां घ्या, तसं न्हवं. पर म्हमईच्या मानसांचा सारा सैंपाक कोळशावर, चूल पेटवली कीं त्या म्हमईतल्या टिचरभर खुराड्याचं धुराडं व्हायचं. मानसानं गजबजलेल्या म्हमईतल्या त्या दीड अंकनाच्या खोल्या

बघीतल्या कीं मला खुराड्यांतल्या खबुतरांची सय येतीया बघा. एक्का कप्यांत नरमादी बसल्याती आपलं कुटूर्रघुम् कुटूर्रघुम् करीत. आतां आंबलं त्येचं तें सुख या लढाईनं, आजकाल म्हमईत न्हायाला जागा न्हाई न खायाला आन् न्हाई. खोली मिळवतांना तर उपाजल्याली एळ आठवायची पाळी येतीया. बरं कोळश्याबिगार मिळालेला शिदा शिजवायचीबी पिडा—इष्टोला घासेलट न्हाईन् शेगडीला कोळसा न्हाई, दादला बसतुया डोक्सं धरून अन् बाईल बसतीया त्येच्या कपाळाला सूट थापीत. घरांत धूप घालायला बी कोळसा न्हाई.

**लीला**—कांहीं तरीच काय सांगताय् काय ?

**ज्योति**—काय तरीच म्हंजी काय ? सोम्यानं गोम्याला सांगितलेल्या सांगीवांगी गोष्टी सांगतुया व्हय ? पंधरादि झालं असत्याल मी सोतां म्हमई-सनं म्हागारा आलो. म्हमईची फटफजीती बगीतली न् ज्यो जीव घीवून येका पायानंच पळालों, त्यो हतं ह्या जित्रबाच्या मळ्यांतच भुईला आंग टेकलं बघा. माझी पोरगी असतीया ततं गिरणगांवांत, म्हटलं, लेकीच्या गांवाला जावं, तूपरोटी खावी न् मोठंधाटं व्हावं; तर ह्यो बैदा ! तुपाचा वासबी न्हाई अन् रोट्या सातूच्या ! आमच्याकडं जानवं घालायच्या वक्ताला बामनं तेवढी खात्यात सातूच्या पीठाच्या गोळ्या. एऱ्ही आमचं ढोरबी त्येला त्वांड लावतांना कांकू करतया.

**लीला**—चालायचंच. लढाईचा काळ आहे.

**ज्योति**—बरं झालं बघा ही लढाई आली. आवंदापावत ज्यो उठायचा त्यो खेड्यांतला जमिनजुमला टाकून म्हमईला पळायचा. वसाड पाडली संमदीं खेडीं या म्हमईनं. आतां बघा कीं म्हमईत जरा कुठं खुट्ट झालं कीं दिसल त्या गाडीनं जो त्यो खेड्याला मागारा पळतुया. बरी जिरली या म्हमईवाल्यांची. हाय काय त्या म्हमईत ? तूपपोळीनं जेवनार, बाजरी आन् सातू खाऊन झाल्यात धान्यांतल्या चिपाडागत. बरं मिळल त्यो शिदाबी कैद्यावानी जोकून ध्याचा आन् जोकून खायचा ! आमां खेडवळास्नीं भिकारी म्हनंत व्हतं न्हव, आतां त्येच हूमा न्हात्यात झोळ्या न् बाटल्या घेऊन सरकारी दुकानाम्होरं. अश्शी वळीनं भिकाऱ्यागत.

**लीला**—तें कां? सरकारनीं खूप व्यवस्था केली आहे धान्यवाटपाची.

**ज्योति**—अवं लीलाक्का, तेवढंच चुकलं म्हनतों न्हवं सरकारचं! ह्यास्नी असंच व्हावं, आमास्नी नांव ठिवत्याती ह्ये! म्हनं, खेडयांतलीं मानसं गावंढळ, लंगुटी नेसत्यात. व्हय, आमी नेसतो, पर आतां कापडाचं आनकी कडाडल्यावर हे काय नेसत्याल? कां कनगींत बसत्याल? ह्येंचं सूट गेलं वाऱ्यावर पर आमची लंगुटी घोंगडी हाय जाग्यावर. कापूस आमच्या रानांत पिकतोया लंगुटीपुरता न् घोंगडयाला मेंढराची लोकरबी काय आमाला इलायतास्नं आनायची न्हाई, ह्येंच्या बोटी बंदराला लागूं देत, न्हाई तर अर्ध्या समींदरांत गटांगळया खावूं देत. आमास्नी काय त्येचं सुखदुख. आमचा धडुतकपडाबी आमच्या रानांत पिकतोया गव्हातांदळावानी! म्हमईला बघा कीं मोटमोटं सरकारी अंमलदार दिकून साळंतल्या पोरावानी चड्डया नि दंडक्या घालून हिंडत्यात. लोकरीचीं कापडं अन् गळयाभंवतालचीं फडकीं मिळत्यात कुठं? त्येंची फॅसन पार उडाली आभाळांत या लढाईच्या धडाक्याबराबर! कसली म्हमई! मानसांचीं बाहुलीं करायचा कारकाना त्यो!

**लीला**—असं कसं म्हणतां काका? मुंबई हें गरिबांचं मायपोट आहे!

**ज्योति**—तर तर, बोलन्याची ढप्पल सोपी न् चार हात लांकडाला नऊ हात ढलपी! म्हमई गरिबाचं मायपोट म्हनं! आमी गरीब लोकच म्हमईचं पॉटं भरतुया. आम्ही पिकवलंच न्हाई तर खात्याल काय हे म्हमईवालं? सात रस्त्याचा धुरळा? त्योबी न्हाई त्या म्हमईत. गांवांत डांबराच्या सडका न् गांवाबाहेर समींदर-त्योबी खाऱ्या पान्याचा. ढोराचीबी तहान भागायची न्हाई त्येनं. सरकार मंदीं पडलं म्हनून, न्हाईतर पान्याएगळया माश्यागत तडफडली असती सारी म्हमई चौपाटीच्या वाळूला. मानसास्नी जनावरावानी पेंड खायाची पाळी आलीया.

**लीला**—पण पैसा तरी आहे ना मुंबईत?

**ज्योति**—निसत्या पैशाला काय दाढंखालीं घालून रगडायचा हाय व्हय? "पैशानं राजाची रानी मिळतीया" म्हनायचं दिस गेलं आतां. पत्त्यांच्या पानातली रानी दिकून सव्वा रुपाया टाकल्याबिगार मिळत न्हाई!

**लीला**—पण सव्वारुपाया हातीं असल्यावर येतेच ना ती राणी!

**ज्योति**—व्हय ! येतीया कीं कागदांतली रानी. " कागदाचाच पैसा अन् कागदाचीच रानी " म्हमई येवढी तालेवारांची हाये तर मग या असल्या तरन्याताठ्या पोरी, म्हमईचं कागदी पैलवान सोडून कां हिंडत्यात मराठमोळया शिवबाच्या मागं आँ ? कावं ! आतां का गप बसलासां ?

**लीला**—आतां वडिलधाऱ्या माणसासमोर काय बोलूं ?

**ज्योति**—ज्येला लाजायचं त्येच्या संगं बालबाल गोष्टी करतासा न् मला म्हाताऱ्याला काय लाजतायसा ? खरं देवाच्यान् सांगा, शिवबानचं लिवलं व्हतं न्हव तुम्हाला नोकरी सोडून बिगीबिगी या म्हणून ? व्हय ! म्होरच्या सोमवारी फलटनींत जानार हाय त्यो !

**लीला**—( एकदम चमकून ) काय म्हणतां काय ? ते युद्धावर जाणार आहेत ? तसं कांहींदेखील लिहिलं नव्हतं त्यांनीं पत्रांत—? फलटणींत—सैन्यांत—युद्धावर जाणार आहेत ते ?

**ज्योति**—कां एवढी चकारलीस कां ? पलटनींत जानं काय तमाशांत जान्यागत बेअब्रूचं हाय व्हय ? कैक शान्या सुरत्यासनी या लढाईवर जाणं गाढवपनाच वाटतंय हें मलाबि ठावं हाय ! आपुन गुलाम-गुलामानी सरकार-साठीं लढून परक्यासनीं चितपट करायचं, म्हंजे सोताच्या मानेवरचं जूं जड करून घ्याचं हें मलाबी कळतयू. या तळमळीपायीं तर पोरी नऊधा सालच्या चळवळींत शिरलों व्हतो मी. तरुनपणची रग व्हती अंगांत तंवर लई असलं छंद केलं आम्हीं. सरकारच्या दप्तरालाबी नोंदल्यालं हाय ह्यें—आमच्यातलं कैक जन फांसावर गेलं—कैकजन काळ्यापान्यावर गेलं—आनी कैकजन कायमचं फरारी झालं. मी मोठ्या सर्तीनं त्येंतनं बचावलों. ती कथा काय एगळीच हाय !

**लीला**—म्हणजे तुम्ही त्या वेळच्या क्रांतिकारकांत होतां ? नऊदहा सालचे क्रांतीकारक म्हणजे राष्ट्राचे पहिले-वहिले सेनानी ! मग काका, ज्यांच्याविरुद्ध तुम्ही बंड करून उठलांत त्यांच्याच साह्याला आज आपल्या पुतण्याला पाठ-वायला कसे·काय तयार झालांत ?

**ज्योति**—कसा तयार झालों ?—पोरी एकदोगांचं धाडस या कामीं उपेगाला येत नाहीं असं अनुभवानं ठरलं— त्या वेळचं कैक मर्दगडी सरकारनं टांचंखालीं रगडून टाकलं ! पर जे बचावलं त्येनीं आपल्या मनाशीं कयास बांधला कीं,

येवढ्या मोठ्या ताकदीसंगं झुंजायला उमाप तयारी व्होवी. त्येला अशचि एकांदी संधि गांठली पाहिजे या लढाईसारखी !

**लीला**—मग काका चवदा सालच्या महायुद्धांत कां नाहीं मिसळले त्या वेळचे तुमचे सारे क्रांतिकारक ?

**ज्योति**—कोन म्हणतो न्हाई म्हणून ? माझ्यावानी कडवं म्हराठं व्होतं त्ये घुसलंच कीं त्या लडाईत. ( लंगडा पाय दाखवीत ) हें बघ माझ्या मर्दुमकीचं पदाक. लढाईत पाय तुटला ही गोष्ट मानाची हाय पोरी, आमच्या लढाऊ जातीला. आघाडीवर गेलों आनी पहिल्या धडाक्यालाच पाय गेला. आपल्या दैवाचा ख्योळ ह्यो. त्याला कोनी काय करायचं ? भरल्या ताटावरनं उठलों. उंडेड म्हनून एक दिस मागारा आलो मायदेशाला. मर्दुमकी गाजवायला सवडच मिळाली न्हाई. मन उपाशी न्हाईलं. परवांच कुठंसं ऐकलं म्यां कीं, कुनी 'येसवंतराव घाटगे' नांवाचा म्हराठा वाघावानी मर्दुमकी गाजवून लढाईत मेला अन् सरकारनं त्येच्या बायकुला व्हिक्टोरिया पदाक दिलं. वारं बहाद्दर ! अजूनपावत कुना म्हराठ्याला मिळाला न्हवता ह्यो मान ! ह्यो मान पहिल्या लडाईतच मला मिळायचा—पन नशीब लंगडं ग नशीब लंगडं पोरी, ती तवाची माझी भूक न्हायलीया. जीव तळमळतोया—लढाई घनचक्कर चालली व्हती—लंगडत लंगडत खालच्या 'गणपतीआप्पा'कड जाऊन 'केसरी' ऐकायचा. लढाईची धुमधडाका केसरींतनं कानांवर पडली की माझ्या डोळ्यांतनं पाण्याच्या धारा लागायच्या. उभ्या जलमांत माझ्या डोळ्यांतला टिपूस कुनी पाह्यला न्हवता पर या पायानं मला जलमभर रडत बसवला. सरोबरीचं गडी लढाई संपल्यावर हिऱ्यामोत्यावानी अंगावर जखमा घेऊन म्हाघारी आलं—कुनी सुभेदार मेजर...कुनी हवालदार तर कुनी कप्तान झालं व्हतं. त्येस्नी भेटतांना तर काळजाचं टुकडं झालं माझ्या !

**लीला**—होय, पण शरीर पंगु होऊन बसलं त्याला तुमचा तरी काय इलाज होता ?

**ज्योति**—ह्यो लंगडा पाय घीऊन तसाच चार वर्सं बायकापोरासाठनं जगलों —पर थोरल्या सांथींत तींबी सारीं देवाघरीं गेलीं. घराची अक्षी मसनवाट झाली.—पानी द्यायला मानूस उरलं न्हाई का दावनीला दोन पायाचं कोंबडं

जगलं न्हाई. न्हाई म्हनायला ह्या तुझ्या शिवबाच्या आईनं अंगावरलं दूध पाजून एक पोर जगावली. तीच म्हमईला हाय. शिवबाच्या बाचं न् माझं तसं कांहींच नातं नाहीं—

**लीला**—नातं नाहीं? तर मग तुम्ही जिवबा नानाचे वडील बंधु आहांत असंच मला बाबांनीं देखील सांगितलं होतं! आणि हेही तुम्हांला आपले सख्खे चुलते म्हणून सर्वांना सांगतात.

**ज्योति**—एका आडनांवाचं— एका काळजाचं म्हराठं. एवढाच धागा-दोरा म्हनीनास. मी असा पंगु झालों. दवापान्यापायीं व्हती न्हवती तेवढी शेतीवाडीची पार ढानकाला गेली. त्यो बघ समुरचा पानमळा! कर्जापायीं छोटूमल मारवाड्याच्या मढ्यावर घातला. लई वाईट हाय त्यो मारवाडी. पैशावरचा साप हाय निसता.

**लीला**—अगबाई! जिवबा घोरपड्यानां कर्ज देणारा तोच ना हा छोटूमल मारवाडी?

**ज्योति**—व्हय! त्येला बघीतलं कीं टक्कुऱ्यांत झिनझिन्या येत्यात बग! अजून सरकारनं जाहीर करावं— म्हाताऱ्यांची अन् पांगळ्यांची पलटणींत जर्वर हाय म्हणून— अस्सा धांवत जाईन अन् छातीवर रानीचं पदाक झुल-वल्याबिगर मागारी येनार न्हाई. पर तसं न्हाई ग पोरी! तसं असतं तर खोऱ्यानं पैका वढला असता अन् परक्याच्या घरीं गेल्याली माझी रानलक्ष्मी या दनगट हातांनीं अशी पदराला धरून, माझ्या पोरासमोर उभी केली असती. काय सांगू पोरी? तळमळ—आग व्हतीया निसती धीची. लढाईचं नांव ऐकलं कीं घुसून मरावंसं वाटतं—पर काय करूं? दोन्ही बाजूनं लंगडा झालों— पायानं न् नशिबानंबी. मला जलमांत कराय आलं न्हाई त्ये माझ्या पोराला तरी करूं दे!

**लीला**—पण काका, त्यांनीं ऐन तारुण्यांत युद्धांत उडी घ्यायची हें माझ्या मनाला खरंच पटत नाहीं. माझ्या इतकीच त्यांची काळजी तुम्हांला आहे.

**ज्योति**—पोरी! तुझा शिवा जलमला जिवबाच्या पोटीं पर पोराचा गडी झाला या लंगड्याच्या अंगाखांद्यावर. त्येनं पोटच्या पोराकिंदी लई लळा लाव-लाय मला. त्येला द्येयाला माझ्यापाशी कांहीं उरलं न्हाई. माझं येवढं लढा-

ईंत जायचं थाड तरी दिवूं दें कीं त्येला. आमी संताजी घोरपड्याचं आडनांव लावतों. जाऊं दे लढाईवर. जगला वांचला तर उंद्या सोराज्य झाल्यावर सेनापति व्हईल—मेला तर—

**लीला**—काका, काका, नका ना असं कांहींतरी बोलूं! नुसत्या बोलण्यानं आणि कल्पनेनं माझ्या काळजाचे तुकडे होताहेत. मग प्रत्यक्ष—नको —कांहीं नकोच तें दृश्य. काका, नकाहो असं कांहींतरी भलतं बोलूं.

**ज्योति**—डोळं कां भरतीस? तुला रडून भागायचं नाहीं. बामनाची लेक असलीस तरी रनशूर पेशव्याच्या जातीची हाईस. दिल्लीचं तक्त फोडनार, या अटकेवर झंडं लावनाऱ्या पेशव्याच्या जातीची हाईस. तुला कां ग लढाईचा इत्का तिटकारा?

**लीला**—काका मग खरंच तुम्ही त्यांना लढाईवर पाठवणार?

**ज्योति**—व्हय, आन् म्हणूनच एवढ्या तांतडीनं त्यानं तुला बलावून घेतलीया. पोरी, आमी आतां पिकलीं पानं झालों. त्यो फलटनींत जायाच्या अदुगर एकदां भवल्यावर चढा तुम्ही दोघं. हळदीच्या अंगानं एकदां जोडीनं डोई ठेवा या पांगळ्याच्या एकुलत्या एका पायांवर. पोरी मला साकार एकदां घालूं दे तुझ्या तोंडांत.

**लीला**—काका, किती प्रेमळ आहांत तुम्ही! तुमच्यासारखीं वडील माणसं लाभायला खरंच पूर्वजन्मींची पुण्याई पाहिजे.

**ज्योति**—पोरी, त्ये माझं सपान आज खरं व्हईल का? तूं थोरामोठ्याचीं लेक, आमी ह्ये असं पोटाचं हमाल. तुमी बामनं आमी म्हराठं, तुझ्या बापाला कशी पटावी ही सोयरीक? तुझीं लई पत्रं वाचून दावलीं शिव्यानं मला. मन परसन्न झालं. तुमची जोडी जलमाची होवूं द्या! तुझ्या बापाला पटलं न्हवं आमचं दरिद्री घरानं?

**लीला**—असं कां वाटतं तुम्हांला काका? तुमचं घराणं आमच्यापेक्षां कां कमी मोलाचं?

**ज्योति**—दाताड फोडून दिन तसं म्हननाऱ्याचं संताजी घोरपडयाच्या घरान्यांत जलमलाय माझा शिवबा. पुळ्यांत जेवलल्या बामनाच्या पोराला निसत्या लाडाखातर आखखं राज बक्षीस देनाऱ्या घोरपडयाचं घरानं नाचार

म्हनायची कुनाच्या अंगांत धमक हाय ? (उसासा टाकून) पर या घरान्या-च्या मोटेपनापायींच आमी खालीं आलों. मिळकत कमी झाली पर दानत वसरली न्हाई—त्येनं घर लागलं वाहवटीला. तीस वर्सं घरान्याच्या मोठेपनाचा बोज संभाळतां संभाळतां कर्जाच्या डोंगराखालीं दडपलों. त्यांतनं आमचा जिवबा म्हंजी परत्यक्ष तुकारामहाराजांचा आवतार. दुनियेचं छक्यापंजाचं डाव त्येच्यानं झेपलं न्हाईत. छोटूमल मारवाड्याच्या थोबाडांत चाललाय् मोठेपणाचा ह्यो सारा ख्योळ. बडा घर न् पोकळ वासा म्हनत्यात तशी गत झालीया. आवंदा या लडाईनं कुठं चांगलं दिस दावल्यात. आतां बघायचं म्होरं काय व्हईल त्यें. पर तू माझ्या शिव्याची घरधनीन झाल्याबिगर ऱ्हाऊं नग. या पडत्या घराला तुझं सोन्याचं पाय लाव, छाती काढून एखांद्या किल्ल्यावानी खडा व्हईल ह्यो घोरपड्याचा पडका वाडा!

**लीला**—माझी इच्छा देखील याहून दुसरी काय असणार ? तुमच्या कर्ज-पाण्याचे कागदपत्र छोटूमलनें बाबांनाच दाखवले आहेत. आमची मैत्री त्यांना माहीत आहे. म्हणून त्यांनीं मला मुद्दाम लिहिलं होतं पाय टाकते आहेस पण जपून. जाणून बुजून दुःखांत शिरूं नकोस.

**ज्योति**—दुख कसलं रं म्हणावं त्यांत ? घोरपड्याचं नांव लावन्यासाठीं रगताचं शिपनं करावं लागतं म्हनावं ! कांग्रीसांत शिरल्याबरोबर आपल्या म्हराठ्यांचं मोठेपनबी इसरला का काय त्यो ? अर भुकेनं मेलों तरीबी आमी म्हराठं—जातिवंत म्हराठं. आमचं म्वाल पैक्यावर मोजतां ?

**लीला**—[ घाबरून ] तसे माझे बाबा फार उदार मताचे आहेत काका !

**ज्योति**—तुझ्या बाला मी वळखतों पोरी. घासालच्या चळवळींतला त्योच तर आमचा म्होरक्या.

**लीला**—कोण ? माझे बाबा ?

**ज्योति**—व्हय. या गांवांतलीं आमी तीन पोरं हुतों. मी, तुझा म्हादव-राव अन् पिंपळाखालचा ग्यानबा. रातीच्या राती आमच्या इच्यारमसलतींत जायच्या गांवाबाहिरच्या पडक्या देवळांत. मी न् महादेवराव कसंबसं वांचलों पर ग्यानोबाचं नांव सरकारला गावलं. त्येचं नव्यानं लगीन झालं व्हतं—बायको हातंच टाकून त्यो कुठं पळाला त्येचा पत्त्या नाहीं. पुन्हां त्यारा वर्सांनीं आला न् बायकोला घेऊन तकडं पुन्याकडं गेला. त्येचं म्होरं काय

झालं त्यें भगवानाला माहीत. त्येच्यानंतर सत्‌समाजाची चळवळ जोसांत आली व्हती. साऱ्या बामनास्नी ठठकळा आनली व्हती ह्या एडया मराठ्यांनीं, पर आमी दोगांनीं समजुतीच्या गोष्टी सांगाय् सुरवात केली तवा साऱ्या गांवाचा मार जोडीनं खाल्लाय् आम्हीं दोगांनीं. म्होरं त्यो वकिलीसाठीं पुन्याला गेला– कांग्रीसांत शिरला. अन् इसरला आपल्या जुन्या दोस्ताला. लईदि रिनानबंद तुटल्यागत झालाय्. तुमच्या लग्नानं आमी पुन्हा नव्या नवलाईनं भेटूं !

**लीला**—मलाही खूप वाटतंय् ! बाबा माझ्या आड येणार नाहींत; पण हे युद्धावर जाणार हें कळल्यावर मात्र ते अडथळा केल्याशिवाय राहणार नाहींत. ते म्हणतात, हें युद्ध हिंदुस्थानचं नाहीं.

**ज्योति**—एड लागलय् त्येला. आखाडा कुनाचा का असेना कुस्तीचं च्यार डाव शिकून घ्यायला काय हरकत हाय ? लढाई आमां मराठ्यांच्या पांचवीला पुजली हाय. काळ पालटल्यानं सभाव पालटत नसतो. खाऊन मस्त झाल्याला खॉड बरोबरीचं जनावर घावलं न्हाई तर रग जिरवायापायी खडकासंगं टकरा घेतं. या लडाईत जाऊने तर काय करावं काय आमी ? मी सांगतों त्येला. माप वकील असला तरी माझ्याम्होरं न्हाई डाळ शिजायची त्येची. लव्हाराच्या आळीला कुठं उलाथनी खपत्यात व्हय ? आमची वयनीबी लई इरुद व्हती या सोयरीकीच्या. तिचं म्हननं, आपल्या जातींत काय पोरी न्हाईत ? पर म्यां म्हटलं न्हव त्ये ! बायकु म्हंजी काय भादव्यांतली गवर हाय ? एक दिस पूजा नी एक दिस पाठवनी कराया. जलमाचा सवाल हाय त्यो ! दोगांच्या इच्यारानंच व्हाय्‌ला व्हांवं. एडी हाय माझ्यागतं. तिला पटलं कीं माझं सांगनं. आडानी मानस आमी. आमचा आडानी हिसाब ह्यो असा.

**लीला**—तुम्हांला आडाणी कोण म्हणेल काका ? केव्हढी उदात्त आणि उदार मतं आहेत तुमचीं. पुण्यामुंबईला जन्माला आला असता तर ज्योतिबा फुल्यांसारखं मोठेपण मिळालं असतं तुम्हांला.

**ज्योति**—ऑं ? आतांच लागलीस कां म्हाताऱ्या मामंजीचं कौतक करायला ? माझ्या कुळाची लक्ष्मी ती ! [ तिचा लाडानें गालगुच्चा घेतो ] बरं तुझा बान् आमचा जिवबा भेटलंच न्हाईत कां तुला गांवांत ? शिव्यानं अन्

म्यां लई धोसरा घेतला म्हून त्यो सोताच गेलाया तुझ्या बापाकडं मागनी घालाया—

**लीला**—असं? नाहीं. मला कुठंच गांठ पडली नाहीं त्यांची. मी इकडे यायला निघेपर्यंत बाबा घरींच नव्हते. नोकरानं सांगितलं, ते एका पक्षकाराबरोबर गेले आहेत म्हणून.

**ज्योति**—त्यो त्यो आमचाच पक्षीकार, वकिली तिड्यांत न्हाई गावला म्हंजी मिळवली. पोरी, तुझ्या बानं व्हकार भरला कीं दिऊंया धडाका उडवून: खरंच, मोठ्या भाग्याची पोर हाईस तूं. माझा शिवबा म्हंजे थोरल्या शिवाजी राजाची जित्ती आठवन हाय. हाडानं जित्का दमदार तित्कंच त्येचं डोक्सची तल्लख. तालमींत गडी न्हाई उभा व्हावूं देयाचा म्होरं. अन् जोडीला जोड मिळालीच तर तांबड्या मातीचा कन न्हाई चिकटूं द्यायचा पाटीला. शिकारीला गेला, तर उगा व्हलगाडावर न्हाई काडतूस खर्चायचा. गांवजेवनाला पुरल असं जनावर खांद्यावर टाकून आनील. तूं त्येची रानी हो—या रानची रानी हो! दोगंबी खेळा, भांडा. तूं माळ्यावर हूभी व्हाऊन पांखरं राखीत गानीं म्हन. त्यो मोटवर हूभा व्हाऊन रांगडी ललकाऱ्या घुमवील. सुखाचा मळा पिकवा या काळ्याभोर जिमीनींत! तुमचं क्वाडकौतुक कराया आणखी चार दिस जगन मी!

**ज्योति**—अरं, कायरं खजबजलं तकडं? बांधाव बाधल्याला खाँड सुटलं काय? (शिवबा येतो)

**शिवबा**—...ज्योतिकाका, ज्योतिकाका—

**ज्योति**—कारं थकलास व्हय? सकाळच्यानं मोटा वढतूया माझा ख्वाँड!

**शिवा**—नाहीं. थकलों नाहीं. पण—(चांचरतो)

**ज्योति**—बघीतलंस पोरी, अशी हाय आमच्या घराऱ्याची रीत. मी हुतों इथं म्हनून तूं आल्याली। ठाव असूनबी, ह्यो पोरगा वसावसा येऊन तुला भेटला न्हाई. रक्ताचा गून ह्यो. शिकला संवरला म्हून काय झालं? वडीलधारं केलय कशाला? शिवबा आतां मी जातु! तूं बोल हिच्यासंगं. बैलं सोडलीस न्हवं? मी करतों चारापानी. काय नग लाजायला! (शिवबास) काय रं?

**शिवबा**—(केवळ सूचक हंसतो).

**ज्योति**—अरं गुलामा. बघा ल्येकानों तुमच्या वक्ताला कसा काळ आलाय्. दोन पोरं झालीं तरी मी कारभारनीसंगं बोललों न्हवतों.

[ हसत हसत निघून जातो. ज्योतिबा लांब गेला आहे असं पाहिल्यावर शिवबा लीलेच्या जवळ येतो. ]

**शिवबा**—कवा आलीस ग ? बस कीं त्या पारावर! अशी हुभी कां राहीलीयास कोल्हापूरच्या आंबाबाईवानी ?

**लीला**—पुरे! तुम्हांला काय झालं हो असली भाषा बोलायला ? कॉलेज-मध्यें असताना तर अगदीं मराठीचे पंडीत म्हणून प्रोफेसरदेखील तुम्हांला म्हणत.

**शिबवा**—व्हय पर. जात्यावर बसलं कीं ववी सुचती तसं मोटवनावर गेल्यावर रांगडी बोलीच व्हटावरं येतीया, तेला करायचं कसं ?

**लीला**—अय्यो बय्या! मग म्यां आतां मोटकऱ्याची सजनि झालीया तर—

**शिवबा**—व्हय तर कां ? कालीजामधली लीली हातं कशाला येतीया ? जिवाला लळा लावायचं काम तेवढं केलं तिनं ततं बसून इंटरपावतर. फास होत गेलों ही खंडोबाची किरपा. न्हाई तर— बुक वाचायला घेतलं कीं त्यांतलं आक्षरच दिसायचं न्हाई मला. समदिकडं लीलाचंच लाजरं डोळं— ती लीला म्हमईला गेली तवा 'बी. ए.' फास हुयाला मिळालं.

**लीला**—मंग ही तुमच्यासामनं लीला हाई ती कोन ?

**शिवबा**—ती न्याहारी घिऊन आल्याली मोटकऱ्याची सजनी.

**लीला**—व्हय, व्हय आलेयाच मी न्याहरी घिऊन—चला.

### द्वंद्वगीत

**लीला**— ह्या हतं सावली गार किती, वर रानपाखरं किलबिलती
**शिव**— बांधावर सोड शिदोरी, खेळीमेळीनं करूं न्याहरी
तुझ्या हातची मीठभाकरी, तुझ्यापरीस मज आवडती
**लीला**— कोरड्यास पर न्हाईच त्याला

शिव-- आंबरसाचा भरला प्याला

लीला-- कुठला ?

शिव-- सजने, तुझीया ओठावरला
ही मीरास माझी मजपुरती

दोघे-- ह्या हृतं सांवली गार किती,
वर रानपांखरं किलबिलती

[ दोघेही बसतात. लीला आपल्या हातपिशवींतून चॉकलेटच्या दोन वड्या काढते व त्याला देते. दोघे हंसतात. ]

शिवबा--कॉलेजमधलं चॉकलेटचं व्यसन सुटलं नाहीं वाटतं अजून ?

लीला--व्यसनं सुटण्यासाठीं लागत नाहींत. बाकी कित्ती आठवणी आहेत नाहीं या चॉकलेटच्या मागं ? हें चॉकलेट म्हणजे गॅदरिंग, हें चॉकलेट म्हणजे फर्ग्यूसन हिल्, हें चॉकलेट म्हणजे अंधारांतले सिनेमा शो ! हें चॉकलेट म्हणजे सारं कांहीं.

शिवबा--अरे बापरे ! आतां काव्य करणार काय तूं ?

लीला--छे छे मुळींच नाहीं, खा, खा ना तें. [ शिवबा खातो व तीही एक तोंडांत टाकते व क्षणार्धांत थू, थू, करून थुंकते. ]

शिवबा--काय झालं ग ?

लीला--खारट आहे मेलं-

शिवबा--चॉकलेट म्हणजे काय पुडाची वडी आहे होय ? खारट लागायला ? माझं तर कसं गोड आहे बुवा !

लीला--[ त्याची वडी जवळ जवळ हिसकून घेत ] बघूं-बघूं ?

शिवबा--भले, हे सिनेमांतले चाळे चालायचे नाहींत हं इथें ! मोटवणार ज्योतिकाका आहेत न् पलीकडे फडांत तुझी ( डोळे मोठे करून ) सासूबाई आहे.

लीला--खरंच ? मग ठीक झालं बाई, ही अशीच 'इन् डायरेक्ट मेथड' वापरली ती-[ दोघंही मोठमोठ्यानं हसतात; लीला हसतां हसतां गंभीर होते. ]

**शिवबा**--कां ग ? एवढी गंभीर कां झालीस ? बरी दिसत होतीस कीं हसतांना ?

**लीला**--मघां काय म्हणत होते तुमचे ज्योतिकाका ?

**शिवा**--मला फक्त तुझं गाणं ऐकूं आलं. बोलणं कांहींही कानीं पडलं नाहीं.

**लीला**--पण ते म्हणाले तें खरं का ?

**शिवा**--ज्योतिकाका कधींच खोटं बोलत नाहींत. पण काय म्हणाले तरी काय ते ?

**लीला**--ते म्हणाले कीं, तुम्ही लढाईवर जाणार आहांत म्हणून !

**शिवा**--होय, पण ते लग्न झाल्यावर आधीं नाहीं. अन् त्यांत एवढं वाईट वाटण्यासारखं आहे तरी काय ? मी लढाईवर निघालों कीं माझा केसरींत फोटो येईल. मेलों तर चित्रमयजगतांत येईल–नि जगून वांचून परत आलो तर किर्लोस्कर मासिकांत चरित्र येईल–आहेस कुठें ?

**लीला**--पुरुषांना सारंच थट्टेवारी नेतां येतं. युद्धावर जायचं नक्की करतांना तुम्ही माझा कांही तरी विचार केलांत का ?

**शिवा**--तुझ्याशीं लग्न करण्याचाच विचार नव्हे तर निश्चित बेत केला आहे मीं ! माझ्याकडच्या वडील माणसाची संमति आहे. तुझे वडील सुधारक मताचे आहेत.

**लीला**--तुम्ही इथून जाणार ? नि मग मी काय करणार ? तुमच्यावांचून कशी राहूं ?

**शिव**—म्हणजे ? तुझं माझ्यावर प्रेमच नाहीं असं म्हटलं पाहिजे. प्रियकराच्या केवळ चिंतनांतही जी स्वर्गसौख्याचा अनुभव घेईल तीच खरी प्रेयसी.

**लीला**--माझं तुमच्यावर प्रेम नाहीं असं तुम्हांला म्हणवतं तरी कसं शिवाजीराव ! तुमची मराठमोळी मूर्ती माझ्या हृदयांत कायमची कोरलेली–

**शिव**—मग झालं तर, मी तुझ्यापासून शरीरानंच दूर जाईन. मनानं मी तुझ्या हृदयांत अहोरात्र राहीन. लीली, मी युद्धावर जात आहे तो निश्चित परत येण्यासाठीं. माझ्या हाडापेराइतकाच माझा हा आत्मविश्वासहि कणखर आहे. तसं नसतं तर तुझा प्रश्न मला मुळींच मनावेगळा करतां आला नसता.

**लीला**—थांबा, माझ्याकरितां मी हें बोललें असा तुमचा समज असेल तर तो निखालस निराधार आहे. गुलामाची पट्टराणी म्हणून शयनागारांतलि बाहुली होण्यापेक्षां वीराची विधवा म्हणून वावरण्यांत कुठल्याही हिंदु स्त्रीला अभिमान वाटेल! धन्यता वाटेल!

**शिवा**—शाबास! तुझ्यासारख्या जातिवंत हिंदुस्त्रीचे प्रेमपाश माझ्या पंचप्राणांभंवतीं रंणागंणावरही चक्रव्यूह रचतील नि तो भेदणं शत्रूलाच काय पण प्रत्यक्ष काळालाही अशक्य होईल.

**लीला**—तुम्ही युद्धावर जा! तुमच्या भावना काकांच्या तोंडून उघड्या झाल्या. मी त्यांना आडवूं शकत नाहीं. माझा तेवढा अधिकार नाहीं. वीर अभिमन्यूच्या वीरपत्नीलाही एक क्षणभर मोह झाला होता, मग मी तर— जा! तुम्ही खुशाल युद्धावर जा! तोंवर मी या आपल्या खेड्याची कांहीं तरी सेवा करीन. त्याच्यांतलं राष्ट्रीयत्व जागं करण्याचा प्रयत्न करीन. विजयी होऊन तुम्ही परत याल त्या वेळीं पंचारतीनं तुम्हांला ओवाळीन. जा! खुशाल जा तुम्ही. मी आड येणार नाहीं.

**शिवा**—खरंच लीला, वादळवृष्टीनंतर सृष्टीवर प्रसन्नतेचं स्वतंत्र साम्राज्य सुरू होतं. प्रळयानंतर वडाच्या पानांवर प्रत्यक्ष परमात्मा शिशुरूपानं अवतार घेतो.

**लीला**—तुम्ही नकळत गडकऱ्यांची भाषा बोलूं लागलांत. तीन शतकां-चें अफाट अंतर एका क्षणांत नाहींसं केलंत. क्षणभर मला शिवकालीन मराठ स्त्रीच्या हृदयाचा लाभ झाला.

**शिवा**—चालूं महायुद्धाच्या भीषणतेपोटीं उद्यांचा स्वतंत्र भारत कां नाहीं जन्म घेणार? साम्राज्यसरकारला हिंदुस्थानांतल्या स्वतःच्या वागणुकीची शरम वाटावी इतका थोरपणा आणि त्याग आम्ही हिंदी लोकांनीं दाखवला आहे. ट्युनिशियांतले विजयाचे नगारे इंग्रजी बँडबरोबर वाजले तरी त्यांतले स्वर उफाळून "हरहर महादेव" असाच जयजयकार घुमवीत होते. हिंदु-स्थानच्या पारतंत्र्याबद्दल सगळ्या जगाला चिंता लागून राहिली आहे. कुणी सांगावं युद्धानंतर आपलं हें निष्पाप खेडं स्वतंत्र भारताचं लेकरूं झालेलं असेल. युद्धापूर्वील रशियन खेड्याप्रमाणें तें सामाजिक कुटुंब झालेलं असेल. छोटूमलसारखे धनलोभी सावकार पैशाच्या उबेतून बाहेर येऊन लोकमता-

बरोबर चालत असलेले दिसतील. ज्योतीकाकासारखीं थोर माणसं गांवचं राजकारण संभाळीत असतील. आपला चिमुकला संसार हा गांवच्या सामुदायिक संसाराशी एकरूप होऊन जाईल. स्त्रियांचा वर्ग संपवून वाड्याच्या दारांत तूं माझ्या येण्याची वाट पहात रहाशील. सवंगड्यासह शेतांतून परत येतांना मंद मंद चाललेल्या बैल जोडीला मी सांगेन—

मिळून आल्या तिन्ही सांजा । मावळला दिनमणी
परतल्या घरट्याल्या पक्षिणी
राजा, सरजा, चला गड्यांनों पाय जरा उचलुनी
झालीरे झाली दिवेलागणी
असेल दारीं उभी राहिली जीवाची साजणी
डोळे वाटेघर लावुनी
चलाच, तुमच्या पाठीवरतं
घरधनिणीच फिरतील हात
हिरवा चारा आणि मुखांत
आली आभाळीं पहा गड्यांनो, सांजेची चांदणी
झालीरे झाली दिवेलागणी

[ गाण्याच्या स्वप्नांत दंग झालेली लीला डोळे मिटून शिवबाच्या छातीवर मस्तक टेकते, एवढ्यांत जिवबा व माधवराव यांचा संवाद ऐकूं येतो. त्यांची समाधि भंगते ]

**लीला**—अगबाई ! हा तर आमच्या बाबांचा आवाज.

**शिवा**—चल तर आपण त्या–त्या तिथंच ओढ्यावर बसूं या !

**लीला**—Nice idea. म्हणजे त्यांचीं बोलणीही ऐकूं येतील. सुदैवानं वारा तिकडचाच आहे.

**शिवा**—चल ना मग त्याच वाऱ्याला पाठ देऊन बसूं या–[ दोघेंहि घाईनं जातात. ]

[ जिवबा व माधवराव प्रवेश करतात. ]

**जिवबा**—[ ज्योतिबास ] ज्योति, राऊंदे मॉट, इकड ये वाईच. ह्ये म्हादेवराव आल्यात.

**ज्योति**—आलों आलों गा जिवबानाना.

**माधव**—आपल्या जन्माचा जोडीदार कसा असावा हें ठरविण्याचं काम लीलेचं आहे. तिचं त्याच्यावर खरं प्रेम असेल तर त्याला खुशाल माळ घालावी तिनं. मी आनंदानं आशिर्वादच देईन. मुलगी आईवेगळी आहे. मी तिला लहानपणापासून मुलग्यासारखीच वाढवली आहे. आपण "स्त्री" आहों, पुरुषाची गुलामगिरी हीच आपल्या आयुष्याची इतिकर्तव्यता आहे, अशा या मूर्ख मतांचा वाराही तिच्या बुद्धीला मी कधीं लागूं दिला नाहीं. ती संपूर्ण स्वतंत्र आहे. आपल्या इच्छेप्रमाणें तिनं नार्सिंगचं शिक्षण घ्यायचं ठरविलं त्याच्याही आड मी आलों नाहीं.

**जिवबा**—आपलीच दिष्ट पडेल अशी पीरत हाय त्या दोगांची. लीला-क्कानं सांगितलंबी असल तुम्हासनीं.

**माधव**—होय, तिनं ही गोष्ट माझ्यापासून लपवून ठेवली आहे असंही नाहीं. पण खरं सांगूं जिवबा, माझी मुलगी सुखांत वाढलेली आहे. तुमच्या घरची आजची सांपत्तिक स्थिति–रागावूं नका–मला माहीत आहे. लीलाला कदाचित् त्याची कल्पना नसेल. मी एकवार ही गोष्ट तिला समजावून सांगेन. एकदोन दिवसांत तिला पत्र पाठवून बोलावून घेतों. उगाच छंद म्हणून ती आजकाल नार्सिंगचं शिक्षण घेते आहे मुंबईच्या हॉस्पिटलांत.

**जिवबा**—महादेवराव पैक्याच्या बाजूनं आमी लंगडं हाय ह्ये मलाबी नाकबूल न्हाई. लोकांचं करजपानी हाय खरं माझ्या डोक्शावर. पर आतां शिवबा लडाईवर जातोय्– हां हां म्हनतां मुडापा करून टाकील समद्या देन्यापान्याचा!

**माधव**—मुलगा युद्धावर जातो आहे ही गोष्ट तर माझ्या मुलीला मुळींच पटणार नाहीं. माझ्या मतांचा परिणाम तिच्यावर कुठल्याहि मताहून अधिक झालेला आहे. जिवबा, चालू युद्ध हिंदुस्थानचं नाहीं. हिंदी माणसानं या लढाईंत भाग घेणं म्हणजे जाणून बुजून आत्महत्या करण्यासारखं आहे.

**जिवबा**—असं कसं म्हनतासा वकीलसाब! लडाईवर जानारा हरेक मानूस मरनारच हाय कशावरनं, अन् मरान याचंच असलं तर त्ये घरांत

बसून टळतया थोडंच ? माग न्हाई, म्हमईच्या आगींत शेंकडयानं मानसं मेलीं. आदल्या राती कुनाला सपान तरी असल कां कीं समींदराच्या पान्यातनं उद्यांला अशी आग उसळणार हाय म्हनून ?

**माधव**—हा पोकळ दैववाद आहे नाना ! मरण कुणालाच चुकत नाहीं म्हणून प्रत्येकानं काय हकनाक मरावं ? (ज्योति येतो).

**ज्योति**—हकनाक कस रं ?

**माधव**—ज्योति ?

**ज्योति**—वळख हाय न्हवं ? जिवबा, ह्येच्यासंगं एवढं गुळमुळीत काय बोलतुयास ? कसाची असलास तरी तूं न्हवऱ्याचा बाप हाईस, ह्यो नवरीचा बाप. ह्येनं नाक खालीं करूनच बोललं पाहिजे. तूं ह्येला शोधायला गेलास त्येच चुकलं. चांगलं जोडं तुटस्तोवर हेलाच हेलपाटं दिलं असतस म्हणजे आला असता आपुआप वठनीवर.

**जिवबा**—त्ये कुठलं ? मलाच लागली पायपिटी कराया ह्येच्या भेटीपायीं. ह्या शेजारच्या कदमाच्या वाडींत आलंत कुना पक्षीकाराकडं, ततंच भेटलों न् म्हनलं चला आतां मळ्याकडंच, ततनं ज्योतीबी हाय.

**ज्योति**—मग काय म्हननं काय ह्येचं ? आपल्या जावयानं लडाईवर जाऊ ने ! असंच न्हवं ?

**माधव**—तसं कुठं म्हटलं मीं ? हा प्रश्न मुलीचा आहे–मी फक्त माझं मत दिलं कीं या युद्धांत आपण सरकारशीं पूर्णपणें असहकार केला पाहिजे.

**ज्योति**—ह्ये आमां मराठ्यासनीं न्हाई पटायचं. अर, रानीच्या राजवटींत हातांतनं गळलेलीं हत्यारं आज कैका वर्सांनीं दृष्टीस पडत्यात. भुकेजलेल्या वाघागत अवस्था झालीय आमची. सांडलेलं रगात दिसू दे किं एकदां आमच्या धुंदावलेल्या डोळ्यास्नी–हिंदुस्थानलाबि कुनासंगं कंदी लढावं लागनारच हाय ना ? का लडल्याबिगारच, मारुतीच्या जलमकाळीं नारळ वट्यांत घालत्यात तसं सोराज्य वट्यांत पडनार हाय तुमच्या ? सवय तर हूं दे किं तोफाचं आवाज ऐकायची !

**माधव**—छे ! माणसाच्या जगांत युद्धाला स्थानच नाहीं मुळीं !

**ज्योति**—व्हय पर, देवमानसाच्या दुनियेंत. हातं समदा बाजार हाय

रावनांचाच. शिव्या लडाईवर जातोय म्हणून माजं काळीज सुपाएवढं झालंय् अन् तुमचीं तोंडं कां रं अशी तुराट अन् आंबाट ?

**माधव**—या प्रसंगाची चव आम्हाला कळली आहे म्हणून.

**ज्योति**—हें बग, तुमची कांग्रीस जंवर एकांदि फलटण उभा करीत न्हाई तवर हें आमी असंच जीव देनार. आमचा पिढीजात सभावगून हाय त्यो. वाघाला गवत खाऊन जग म्हनलं तर कसं जमल र त्यें त्येला !

**माधव**—ज्योति, याच विषयावर आपला एकदा कडाक्याचा वाद होऊन डोकीं फुटलीं होतीं, आतां बारा वर्षांनी भेट होतांना तोच वाद कशाला ?

**ज्योति**—त्ये चालायचंच ! तुझ्यामाझ्यामधला ह्यो वाद बरमदेवाच्याबि बापालाबी तुटायचा न्हाई. मंग ह्येचं म्हननं काय जिवबा ?

**जिवबा**—त्येचं म्हनंन शिवबानं लडाइवर जाऊं ने !

**ज्योति**—बर. मंग तर सोयरीक व्हय म्हनत्यात ह्ये ? मंग न्हाई पाटवत आमच्या पोराला.

**माधव**—मुलीची संमति असेल तर माझी कधींच ना नव्हती आणि नाहींही.

**ज्योति**—आतां घ्या ! तुझ्या पोरीच्या लग्नांतबि तुला मत्त न्हाई ?

**माधव**—मत आहे, पण तें मानलं गेलंच पाहिजे असा माझा स्वतःचा मुळींच हट्ट नाहीं.

**ज्योति**—ह्ये ब्येस हाय ! मंग ठरलं पोरगी तयार असल तर चार दिसांत लगनाचा धडाका उडवायचा ? पोरीची साक मी भरतो.

**जिवबा**—मंग कंचा म्होरूत धरावा म्हनतां म्हादेवराव ?

**ज्योति**—अरं आपल्या मनाचा म्होरत. सायेब लोक कुठं म्होरत बघून लगीनं करत्यात त्यास्नी होत्यात न्हवं पोरं बाळं ? आँ–?

**माधव**—मुलीचं मत विचारून चार-आठ दिवसांत कळवितों मी निश्चित काय आहे तें.

**ज्योति**—ठीक हाय तसं करा. पर हातंच तुमच्या पोरगीला आनली तर–( लीलेला व शिवबाला हांक मारतो ) शिवबा ओ लीला—( लीला व शिवबा माधवरावांना नमस्कार करतात. माधवराव आश्चर्यानं पाहतात. ) हातां सांपडला न्हव मुद्देमाल ? ह्येच्या पुढं कुठं चालतुया का तुझा कायदा ?

**माधव**—( आश्चर्यानें ) तूं अचानक इथें कशी लीला ?

**लीला**—तें सार घरीं सांगेन मी बाबा. पण आपण आत्ता आमच्या लग्नाला संमत्ती दिलीत ना ?

**ज्योति**—मडक्यांतल्या पान्यावानी थंडगार पडलं या वकीलाचं डोसकं. माधवराव " व्हय " म्हना आतां.

**माधव**—माझा विरोध असायचं कारण काय ? तिनं यापूर्वींच ही गोष्ट मजजवळ काढली होती. मी तुम्हांला पूर्वींच सांगितलं होतं कीं, हा प्रश्न तिचाच आहे म्हणून ठीक आहे. आनंद आहे. लोक ओरडतील थोडेसे पण लोकमताची दहशत अशा प्रसंगीं घेण्यांत पदरीं भ्याडपणाच येईल. मग जिवबा लग्न थोडक्यांतच उरकून घेऊं ? ( लीला-शिवा निघून जातात ).

**जिवबा**—त्ये बरं ? माझ्या एकुलत्या एका पोराचं लगीन हाय ! थाटांत झालं पाहिजे. घरान्याला शोभेसं झालं पाहिजे. औंदा पीक पानी बि भरघोस आलया. डरन्याचं कांही कारन न्हाई.

**ज्योति**—याड कां खूळ ? चटशारं उरकून टाकायचं. या घरान्याच्या मोटपनापायींच ह्ये दिस आलं.

**माधव**—ज्योतिबा तूं अज्ञान आहेस कीं सज्ञान आहेस ? सनातनी आहेस कीं सुधारक आहेस ? काही कळत नाहीं बघ !

**ज्योति**—मी शेतकरी हाय बघ. आनकीन कोन व्हव ? बरं येत्या गुरुवारचों लग्न-बरं कारं मग ?

**जिवबा**—गांवांतलीं बामन काय याची न्हाईत लग्नाला.

**ज्योति**—सुक कीं दुख त्येच ? परतेकाच्या घरला शिदा पाठवूं आपआप घेत्याल. गव्हातांदळाला मोत्याचं मॉल आलया. खाऊन-पिऊन वर कोकालली तर कोकलूंदे कीं खुशाल.

**माधव**—त्याची नाहीं येवढी काळजी ! ठरलं मग ? जाऊं मी ज्योतिबा !

**ज्योति**—या बरं ! (कडकडून भेटतो) · म्हादेवराव, आपला जुना जिव्हाळा आज पुन्हा उजाळला, आतां आपुन सोयरं झालों. तुमच्यासारखीं मानसं हाईत म्हून अश्या सुधारना घडत्यात. अन् गांवाचं पाऊल सुधारणेच्या वाटंवर म्होर पडत. म्हातारपनीं खेड्यांत ऱ्हाया येऊन तुमी आमच्यावर उप-

कारच केलसा म्हना ना. सत्समाजाची चळवळ मोडून टाकायचा आपला तरुन पनांतल ब्येत आज म्हातारपनीं फळाला आला. पांडुरंग पावला. आतां भेटूंच वरच्यावर.

**माधव**—येऊं? लीला—कुठें गेली ही.?—

**ज्योति**—तकडं फडांत गेली असल वहिनीकडं. तुमी या. पोरीला पाठवून देतों मागनं.

**माधव**—नाहीं! वाडींत घोड्याची गाडी आहे या इथं.

**ज्योति**—मग आमच्याकडबि हाईच कीं गाडी बैलाची!

**माधव**—बरं आहे येतों मी.

**ज्योति**—रामराम!

**जिवबा**—मी येतों की ह्या हतं वाडीपावतर पोचवाया.

(दोघे जातात.)

**ज्योति**—वयनी अव वयनी—

**गौराई**—(लीलेसह येते) काय दाजीबा?

**ज्योति**—झालं, म्या इच्यारनार व्हतों कां सूनमुख बघीतलसा कां म्हून. तर सूनंला पोटशी धरूनच आलासा कीं तुम्ही?

**गौराई**—चांगली गुनाची हाय माझी हीरकनी.

**ज्योति**—माझा पोरगा काय? कारं तूं कां असा उभा बिथारलेल्या बैलागत?

**शिवबा**—काका, काय सांगीतलंत तुम्ही माधवरावांना?

**ज्योति**—अरं गुलामा! काय मामाबिमा म्हनायची बुद्ध घे! कां बारसं जेवलायस त्येचं? काय सांगूं त्येला? सांगीतलं गुरुवारचा म्होरत ठरला म्हून!

**शिवबा**—तें नव्हे, पण माझ्या फलटणींत जाण्याबद्दल काय सांगीतलंत?

**ज्योति**—बघीतलसा वहिनी? हथं बसली ती दोघजन करंजवड्यावर, अर्ध्या हांकच्या अंतरावर, समदं कानावर पडलं असल—अन् सोंग कस आनतोया बघाकीं साळसूद भामट्या!

**शिवबा**—मी सारं ऐकलं आणि म्हणूनच विचारतों तुम्ही त्यांना सांगीतलंत मी फलटनींत जाणार नाहीं म्हणून—

**लीला**—होयच मुळी! मी स्पष्ट ऐकलें ज्योतिकाकांचे शब्द!

**ज्योति**—( लटक्या रागानें ) ए पोरी—! सासूदेखत बोलतीस का दादल्यासंग? काय म्हनलंस त्वां?

**शिवबा**—मी फलटणींत जाणार नाहीं असं सांगीतलंत ना तुम्ही त्यांना?

**ज्योति**—मंग तुज्या बाचं काय गेलरं त्यांत?

**शिवबा**—तसं नव्हे–पण—

**ज्योति**—काय पन काय? ( थोडा वेळ शांतता ) अर गाढवाच्या पुतन्या! मी तुज्या तोंड्याचं करीन व्हय कंदी? मी त्येला लाख सांगीतलं असल पर तूं आपल्या ठरल्यापरमानं म्होरच्या सोम्मारी निघून जा. अर तुला म्हाइत न्हाई का, चांगल्यासाठीं खोटं बोललं तर काय पाप व्हत नाहीं.

**शिव**—( आनंदानें लीलेला उद्देशून ) एव्हरी थिंग इज फेअर, इन् वॉर अँड लव्ह्.

**गौराई**—दाजीबा, शोभतं का तुम्हासनीं हें? ही पोरगी बोलली तवा तिच्यावर डोळं फाडलसा, अन् पोरगा बोलल्यांवर मातुर मूग गीळतायसा व्हय?

**ज्योति**—त्यो बोलायचाच.

**गौराई**—त्यें बरं वं?

**ज्योति**—त्यो पोरगा हाय! बंदा रुपाया! वाजवला कीं ठन्‌दिशी वाजायचा.

**गौराई**—बोल ग बोल. तूं बी बोल.

**ज्योति**—निसती बोलच कां? गानंबी म्हनूं दे किं तिला. आवाज कसा मंजुळ हाय साळुंकीगत. लीला—हें बामनी नांव कसं आळनी लागतय् माझ्या म्हराटी जिभला.

**गौराई**—आतां बदलायचं हायच कीं

**ज्योति**—इक्ता दम हाय कुना त्येकाला? मी तर आत्तापूनच तिला सई म्हनतार—

**लीला**—सई—! खरंच किती गोड नांव आहे. शिवबा–शिवाजी–सई.

**ज्योति**—आत्ता? आवागलीस कां काय ग पोरी? न सांगता न सवरतां न्हवऱ्याचं नांव घीऊन टाकलंस–बरं! म्हन म्हन एकाद गोड गानं—

**लीला**—मला नाहीं येत!

**ज्योति**—पुरं पुरं लाजूं नगस–आता नव्या न्हवरीवानी– म्हन.

**गौराई**—नवी न्हवरीच नव्ह तर कोन ती? विपरीतच ह्येंच बोलनं!

**ज्योति**—अजून न्हवरी हुयाचीं हाय! बरं म्हन म्हन!

**लीला**—
वाजली पांवरी, गोपिका बावरी
रखरखल्या त्या उन्हांत
डोळ्यांवर धरुनि हात
न्याहळीं कितीतरी
यमुना किनारी— १
वृक्षातळीं नंदबाळ
छातीवर रुळत माळ
मूर्त हांसरी
साजिरी गोजिरी— २
शितळता येई उन्हां
मंगलता कुंजवनां
नाचतो मुरारी
राधिका हंसरी— ३

**ज्योति**—काय गोड गळा हाय पोरीचा. बरं. वयनी चांदन्या दिसायू लागल्या आभाळांत हळूहळू. कडूस पडायू लागलं. सईला घेवून जा तुम्ही! तूबि जा शिवबा, मीन् जिवबा न्हातो मळ्यांत. अजून मोट चालल किं पारभर.

**लीला**—अजून मोट चालणार!

**शिव**—कळेल आतां! आम्हां शेतकरी लोकांच्या मनगटावर शहरी

लोकांसारखां घड्याळं बसलीं नाहींत आणि म्हणूनच आमचे हात वाटेल तेवढा वेळ अव्याहत काम करूं शकतात. आमच्या मनगटावर कामाची हुकमत, घड्याळाची नाहीं. चल आई—

**गौराई**—शिवा, पोरगी थकली असल गाडी घीनास वाईच्.

**ज्योति**—काय नग, लागुं दे किं तिला आतां संवय वाईच् पायीं चालायची, अन् थकली तर शिव्या घील तिला खांद्यावर. तसबीरींतल्या पुंडलीकागत ( हसतो )

**लीला**—इश्श !

**ज्योति**—असं मधल्या बांधानं जावा म्हंजी लई न्हाई तकाटा पडायचा.

( जिवबा येतो. )

**जिवबा**—निघालासा ?

**गौराई**—व्हय्, जातु किं आता सारीजन !

**जिवबा**—जातां जातां लीलेला पोचवा हं वाड्यांत !

**ज्योति**—चल, आतां तुला का काळजी ? [ सारेजण जातात, जिवबा व ज्योति राहतात. ]

**जिवबा**—म्हादेवराव मोठा चांगला मानूस हाय !

**ज्योति**—व्हय, म्हनूनच तुझ्या घरांत आज नखितरावानी पोर आपल्या पायांनीं चालून आली. चल, आतां तेवढा उरलेला चार वाकुर ऊस भिजवून काढूया–शिवा येईल रातचं जेवान घेऊन—[ पडद्यांत " जिवबा पाटील " अशा दोनदा हांका गोपाळभट मारतो. ]

**जिवबा**—अरारा, साऱ्या आनंदावर मुरवान पडलं, हें का आलाय ? सांजच्या वक्ताला नांवबी घेऊ ने त्याचं. कां आलय् कुनाला ठाऊक अपेशी त्वॉंड घिऊन ! [ " अहो जिवबा पाटील " पुन्हा हांक. ]

**ज्योति**—अर कां कोकुलतुयास उगाच बेचीच्या देठापासनं ? हांकड ये !

**दिवाण**—( धांपा टाकीत ) कुठाहेत जिवबा पाटील ?

**जिवबा**—रामराम, बसा कीं दिवानजी ! तें कांबळं हाकडं घे ज्योतिबा ! [ ज्योतिबा आपल्या खांद्यावरचं कांबळं फेकतो, जिवबा तें अंथरतो दिवाणजीस बसा म्हणून आर्जवानं सांगतो. पण तो उभ्याउभ्याच बोलत असतो. ] बसा कीं दिवानजी ! पान तरी घ्या.

**दिवाण**—पानाला चुना लावीतोपर्यंत देखील थांबायला तवड नाहीं मला. शेटजींनी आत्ताच्या आत्ता पैसे मागितले आहेत. पैसे घेतल्या-शिवाय माघारी येऊं नका, असं सांगितलं आहे त्यांनीं. नाहीं तर संभाळा. उद्यांच्या उद्या फिर्याद दाखल करून गांवांतल्या घरावर आणि या मळयावर जप्ती आणूं—

**जिवबा**—नगा, नगा दिवानजी, तसं, नगा करूं! पोराचं लगीन काढ-लय् येत्या गुरुवारला. तेवढं उरकूं द्या. त्यांत इगीन आनूं नका. गुराळ झालं कीं गाड्या लावतो आडत्याकडं आन महिन्याभरांत तुमचं सारं पैसं चुकतं करतों.

**दिवाण**—दहा वर्षें हेंच ऐकत आलोंय मी. तें कांहीं नाहीं, शेटजी आतां थांबायला मुळींच तयार नाहीं. वायदे ऐकायचे दिवस नाहींत हे जिवबा पाटील. आत्ताच्या आत्ता पैसे चुकते करा. वकीलाशीं सोयरीक केल्यानं सावकारी पाशांतून सहीसलामत सुटतां येईल, असं वाटलं होय तुला? ब्राह्मणाच्या पोरी फितवल्यानं तुझ्या कपाळचं दारिद्य चुकणार आहे का काय? माधवरावाला हजारदा सांगितलं, पण त्याच्या डोक्यांत प्रकाश पडत नाहीं. वर्णाश्रमधर्माला आग लावायला चालला आहे जसा कांहीं! हें लग्न तुम्ही कितीहि गुपचुप ठरवलं असलं तरी भिंतीला कान असतात बरं का जिवबा पाटील! माझ्या भाच्याला मुलगी दे म्हणतांना माधवनं तोंड वांकडं करून कपाळाला सत्राशें आठ्या घातल्या आणि आतां ती एका मरगठ्याजवळ राहते आहे हें त्याला—

**जिव**—दिवाणजी जरा जीभ आवरुन बोला. आमच्या घरांतल्या चौकश्या तुम्हांला कशाला होव्यात? मी आपल्या पैक्याबद्दल बोला.

**दिवा**—तेवढंच बोलतों. आत्ताच्या आत्ता पैसे चुकते करा. दहा वर्षांत तुला एवढीशी रक्कम फेडतां आली नाहीं.

**जिव**—असं कसं म्हणतां? दर सुगीला तर पैसे देतोय मी तुम्हाला.

**दिवा**—शाबास! जर सुगीला पैसे दिले असतेस, तर आज रकमेची दुप्पट चौपट कां झाली असती?

**जिव**—दिवानजी, उगा गरीबाला गोत्यांत आनूं नका. शेटजी एक परगांवचं. पर तुम्ही तर आमचं ना? तुम्ही कां फसवलंसा मला?

**दिवा**—आमचे गावचे आहांत म्हणूनच आमच्या मुलीचाळी बाटवल्यात तुम्ही. वर्णाश्रमव्यवस्थेचा निकाल लावलात. घरांत खायला अन्न नाहीं आणि ब्राह्मणाशीं नातीं जोडायची घमेंड करता आं मरगठे तुम्ही ?

**जिव**—तुझ्या भाच्याला मुलगी मिळाली न्हांई म्हून आमच्या घरावर उलटलास व्हय सापा. अरे पिळ्यान् पिळ्या जगत आलास कीं आमच्या जिवावर—

**दिवाण**—असं काय ? थांब, काय समजलास काय मला ? उद्याच्या उद्यां कोर्टात फिर्याद गुदरतों आणि ऐन लग्नांत जप्ती आणून तुझ्या दारांतला मांडवच उधळून देतों. त्याशिवाय तूं वठणीवर यायचा नाहींस.

**ज्योति**—जिवबा हान किरे त्येच्या थोबाडांत. गवार्नीतला कुत्रा ह्यो. मांगा, माझीबी शेतीवाडी त्वांच त्या शेटजीच्या घशांत घातलीस. कैकांचीं घरं ढानकाला लावलीस. कैक बायाबापड्यांचं सराप घेतलंस. पाप्या, कुटं फेडनार हैस हे ? माझी बाईल मरून आठ दिवस झालं व्हतं. घरांतली लक्ष्मी देवाघरीं जावून आठवडा लोटला न्हवता, सारं घर सुतकांत व्हतं, अशा वक्ती तूं माज्या घरावर जप्ती आनलीस आणि आतां माझ्या पोरग्याचं लगीन तुझ्या डोळ्यांत खुपाया लागलया व्हय् ? म्हून मांडव उधळतो. कंच्या कायद्यानं रं ? कायदा काय तुज्या पंचागांत हाय व्हय् ? ये की तवं अन् पंच्यांत पाय रहातात का बघ. सत्समाजाची चळवळ काढली व्हती तवाच मरत व्हतास. पर माझ्यासारख्या चार म्हराल्यांनीं वांचवलं. खाल्ल्याघरचं आढं जाळणारी औलाद—( दांत खाऊन ) कांद्यासारखा चेचला असता पन माझा घरांत पोराचं लगीन उभं राहिलय् त्येला अपसकून नग.

**दिवाण**—( जिवबास ) थांब, या तैमूरलंगाप्रमाणें तुझ्याही घरादाराची राखरांगोळी करीन तरच नांवाचा गोपाळराव !

**जिवबा**—( घाबरून ) नगा नगा दिवानजी. मी पाय धरतों तुमचं. तसं वाईटवंगाळ काय करूं नका. ( पाय धरतो )

**दिवाण**—आतां पाय धरायचं सोंग करतोस कायरे निर्लज्जा ! तुझा सारा संसार बेचिराख करतों, गाढवाचे नांगर फिरवतो या मळ्यावरून.—

**जिवबा**—नगा नगा दिवानजी—

**दिवाण**—चल हट् ( लाथ मारतो )

[ इतका वेळ हें स्थिर डोळ्यांनीं पहात असलेला ज्योतिबा एकदम थिथरतो–त्याच्या नसानसांतून राग उसळतो. डाव्या खाकेंतील कुबडी लाठीसारखी आडवी धरून तो ती सणसणून दिवाणजीच्या डोक्यांत मारतो. दिवाणजी खालीं कोसळून पडतो ]



# अंक दुसरा



[ छोटूमल मारवाड्याची पेढी. दिवाणजी एकटाच कीर्दपान उघडून त्यांत नवी मिती वगैरे घालीत आहे, एवढ्यांत हरबा पिसाळ प्रवेश करतो. ]

**हरबा**—रामराम, दिवानजी

**दिवाण**—[ खवचट कडवटपणानें ] या ! हरबा पिसाळ, बऱ्याच वर्षांनीं अगदीं प्रातःकाळींच तोंड दाखवलंत ? गेलीं दोन वर्षं कुठें दिसला नाहींत ? तेव्हां म्हटलं अजून आहांत कीं आटपलांत ? कुठें घोरपड्यांच्या घराकडं निघाला होता वाटतं ?

**हरबा**—न्हाई जी ! आपल्याकडंच आलों व्हतों–!

**दिवाण**—असं कां ? म्हणजे मोठे भाग्यवान् आहोंत म्हणायचे आम्ही ! बसा ! कांहीं घानवट वगैरे असेल ? काय आहे ?

**हरबा**—घानवट ठिवायला न्हाई, हाय त्यें सोडवून न्येयापायीं आलों हाय !

**दिवाण**—असं कां ? धान्याचा वाढलेला भाव बोलतोय् वाटतं हा ?— कोणत्या सालीं गहाणवट ठेवलं होतंत ? आपणच ठेवलं होतं कीं आपल्या वडलांनीं ?

**हरबा**—थट्टा नगा करूं दिवानजी ! बायकू दिसांत हाय, सोन्याचा डाग बराबर असल्याबिगार पयिल्या पोराचं त्वांड बघूं ने म्हनत्यात. तेव्हढी हंसळी मागारी द्या !

**दिवाण**—अरे पण तेंच तुला विचारतोय कीं, हंसळी केव्हां ठेवली होतीस म्हणून ?–

**हरबा**—दोन वर्सं हून गेलीं असत्याल. उंसाला सलपीट् व्होव हुंत म्हून पन्नास रुपय नेलं व्हतं तुमच्या पासनं हंसळी ठिऊन.

**दिवाण**—असं होय ? काय व्याजानं नेले होतेस ?

**हरबा**—त्यें काय बी ध्येनांत न्हाई माज्या !

**दिवाण**—ध्यानांत नाहीं ? पैसे नेले होते एवढं तरी ध्यानांत आहे म्हणायचं ! अरे गाढवा शेटजीनीं ही पेढी धंद्यासाठीं उघडली आहे. धर्मार्थ संस्था नव्हे ही ! दोन वर्षांत तूं पुन्हा फिरकला नाहींस इकडे ! त्या वेळीं सोन्याचा भाव चाळीस रुपये होता दोन तोळ्यांच्या हंसळीवर तुला पन्नास रुपये दिले होते आँ—

**हरबा**—व्हय्‌जी ! ( आठवून ) दोन पैसे व्याजानं—

**दिवाण**—दोन पैसे व्याजानं तूं हंसळी ठेवली काय ?

**हरबा**—अं अं अं–

**दिवाण**—अं अं अं काय लेका ! पन्नासाचं एक महिन्याचं व्याज एक रुपया नऊ आणे झाल. दोन वर्षांचे सदतीस रुपयें बारा आणे झालं. तुझ्या जिनसाची जास्तींत जास्त किंमत ऐंशी रुपड्या होते त्या वेळच्या भावानं काय ?

**हरबा**—[ कांहींच न समजल्यामुळे ] व्हय जी.

**दिवाण**—आणि तुझ्याकडं येणं झालं सत्याऐंशी बारा आणे. आतां तो जिन्नस तुला कसा परत मिळेल ? उलट तूंच आम्हांला सात रुपये बारा आणे आणून दे म्हणजे आमचा कर्जातून मोकळा झालास.

**हरबा**—मी देतों कीं सात रुपये बारा आणे. पर माझी तेवढी हंसळी माघारी द्या ! हं ! हे पैसे सात रुपये बारा आणे अन् ते ऐंशी बी देतों.

**दिवाण**—पैसे असूं देत, पण हंसळी नाहीं परत मिळणार–ती डुलली–

**हरबा**—म्हंजे ? याजासुध्या तुमची रक्कम भागीवल्यावर माजा जिन्नस तुमी मागारी देत नाहींसा ?

**दिवाण**—सईबाईसाहेब घोरपड्यांच्या रात्रीच्या शाळेंत जात असतोस नाहीं कां तूं हल्लीं ? मग उंच व्हायचेच कीं कान ! अरे लेका, आज सोन्याचा

भाव सोळा वर्षांच्या पोरीसारखा उफाड्याला आलाय्, या वेळीं दोन तोळयांची हंसळी एवढ्या रुपयांत तुझ्या पदरांत टाकायला आम्ही काय भांग पिऊन व्याप्रार करतोय् होयरे मरगळ्या? जा, चालता हो! आणि पैसे जास्तच झाले असतील तर आजच्या भावानं दोन तोळयाचे पैसे मोज आणि नवी म्हणून हंसळी घेऊन जा!

**हरबा**—त्यें मलाबि कळतय किंरं, माळावर आरडायला पाटलाची परवानगी कशाला? शेटजी कुठं हाईत त्येस्नीच इच्यारतों मी!

**दिवाण**—शेटजी आंघोळ करताहेत; त्यांना काय विचारणार आहेस कपाळ? वह्या आणि तिजोरीच्या किल्ल्या माझ्या हातांत आहेत. अं? बघतोस काय असा बेवडा प्यालयासारखा? जा चालता हो! गुळाधान्याला जरा भाव आल्याबरोबर मस्ती आली कायरे तुम्हांला?

**हरबा**—हं, दिवानजी मस्तीबिस्ती म्हनायचं काय काम न्हाई. बामन म्हून हुकमत चालवायचं दिस गेलं आतां! बामनबि मानसं अन् आमीबि मानसं हाऊत.

**दिवाण**—असं का? हा वेन्दातहि तुला सईबाईसाहेब घोरपड्यानींच शिकवला का? किती दिवस लागलेरे हें वाक्य तोंडपाठ व्हायला? ती बाटगी कार्टी भलतीच मातली आहे आजकाल!—

**हरबा**—खुट्टावरल्या कावळ्या! सईबाइचं नांव कशाला घेतोस? भुताच्या तोंडांत आई जगदंबेचं नांव कशाला?

**दिवाण**—जगदंबा? जगदंबा का? चांगली आक्काबाई आहे ती? तिचा फेरा आलाय् तुमच्या झोपड्यावर! बाबांनो, धड अंगानं तिचा गाडा एकदां गांवाबाहेर पोचवा.

**हरबा**—तिच्या आंदि तुला पोचवला पाहिजे गांवाबाहिर! चौघांच्या खांद्यावरनं!

**दिवाण**—होय कीं! आतां आमचे खांदेकरी तुम्हीच! तुम्ही सारे सोयरे झालांत ना आतां आमचे! आमची पोरगी दिलीना तुमच्या घोरपड्याला—

**हरबा**—दिवानजी, उगा न्हाई न्हाई ते बडबडूं नकासा—माझा जिन्नस द्या बघूं—न्हाई तर—

**दिवाण**—जा, कोर्टांत दावा लाव माझ्यावर.

**हरबा**—तुला रं कशाला कोरट पाहिजे ? साकरनं मरशील तूं! तुला इख काय करायच हाय ? मुकाट्यानं माझा जिन्नस दितूस का कसं ?— [ उठून त्याच्या जवळ जाऊं लागतो एवढ्यांत छोटूमल शेटजीचा आवाज कानीं येतो. ॐ नमो सिद्धाणाम्, ॐ नमो अरिहंताणम् ! इत्यादि. ]

**दिवाण**—[ तिरसटपणानं ] तिकडे बैस, शेटजी आले. [ शेटजी लक्ष्मीच्या व सर्व सिद्धांच्या तसबिरींना नमस्कार करतो, नंतर त्याचें लक्ष हरबा पिसाळाकडे जातें. ]

**हरबा**—शेटजी म्हंजे काय सांगलीचा राजा हाय काय ? ( बसतो )

**छोटूमल**—हं काय हरबा पटेल ? कबा आलेत ? काय खबरबात ? पीकपानी बरा झाला ?

**दिवाण**—यंदाच्या पिकपाण्याचं काय विचारतांय् शेटजी ? साऱ्या शेतकऱ्यांच्या शनि उदरीं आला आहे. लढाईनं भाव हे असे वाढले आहेत. आणि यंदा जमिनी पिकल्याहि आहेत वेड्यासारख्या—

**हरबा**—व्हय, व्हय, त्येनं तुमचा धंदा बसायची एळ आलीया.

**छोटूमल**—आमचा धंदा बशायचं काय कारन हाय ? उलट आमची वशुली येवस्तशीर होवून जायेल—

**हरबा**—व्हय, पर याजासुद्धा तुमची रक्कम भागीवल्यावराबि ठिवलेलं घानवट म्हागारीं देत न्हाईसा कि तुम्ही ?

**छोटूमल**—अर हितं अशा कोन शांगतो ?

**हरबा**—मी सांगतों न्हवं, दोन वर्सांमागं म्यां ठिवल्याली हंसळी कवाच्यानं मागारी मागतुया ?—

**छोटूमल**—मंग देत न्हाईं कोन म्हनाला ? दिवानजी, दोन वर्सांमागची चोपडी घ्या [ दिवाणजी शांतपणें ती चोपडी काढून देतो. ] कंच्या महिन्यामंदी ?

**हरबा**—आकीतीच्या वक्ताला.

**छोटूमल**—म्हनजे वैशाखमंदी ! [ छोटूमल चोपडी चाळतो, पण त्यांत कांहीं उल्लेख सांपडत नाहीं. ] अरे, ह्येच्यामंदि तुमच्या जिनसाचा आनी तुमचा नांवबी न्हाई !

**दिवाण**—अहो शेटजी, यानं जिन्नस ठेवलाच नाहीं तर नांव असेल कुठलं ?

**हरबा**—आँ ?

**दिवाण**—आँ काय ? कांहीं पुरावा आहे तुझ्याजवळ ?

**हरबा**—अन् त्वां माझा आंगठा उठवून घितला व्हतास त्यो ?

**छोटूमल**—आंगठा उठवून घितला तर तो काय ह्या चोपडीमधून पळून जाएल ?

**हरबा**—अन् मंग आतां माझं पैस घेतलंस ते कश्यासाठीं !

**दिवाण**—[ कांगावखोरपणानं ] बघा शेटजी, कस कुभांड रचतोय तो ! इतक्या हातोहात बनवणं सोपं नाहीं हरबा, अरे तुला हा ( तोड्याकडे बोट दाखवून ) चांदीचा तोडा नको असेल तर घे परत आपले पैसे. [ पैसे फेंकतो ]

**हरबा**—[ संतापून ] अस्स व्हय ? पैसं घे तुला अन् काय इमला बांधायचा असल त्यो बांध. गांवांतच ऱ्हानार हाइस न्हव ? कां शेटजीसंगं जानार हैस त्येच्या मुलकाला ? बराय् शेटजी ! बामना, घानवट ठिवल्यालं तुझ्या ध्येनांत ऱ्हाईलं नाय् पर तुझ्या ध्येनांत राहील असं कांईतरी दिन तुला !

**छोटूमल**—अरे, अशा काय करता हरबा पटेल ? आमची कायबी चूक नाय्.

**हरबा**—तुमची चूक हाय कुठं म्हनतुया मी. ( दिवाणजीस दाखवून ) या या अस्तनीतल्या इंगळाची आग ही. पर ही तुमचं घरबी पेटवल्या बगार ऱ्हायची न्हाय् एवढं धेनांत असूं द्या. येतो मी. बरं दिवानजी ! ( मिशाला पीळ घालीत निघून जातो. )

**छोटूमल**—कै दिवानजी कै घुटाळो है ?

**दिवाण**—घोटाळा कसला आलाय् कपाळाचा. हा सगळा त्या लंगड्या ज्योत्याचा उपद्‌व्याप आहे. पैसेवसुलीला मीं निकड लावली म्हणून माझ्यावर हे असले मोरकरी घालतो आहे. पण शेटजी आपलेच पाय साक्ष ! धन्याची चाकरी इमानें इतबारें करायची एवढं आपल्याला ठाऊक आहे. एकदां देह विकला आहे आपल्याला. तारा नाहीं तर मारा (त्याचे पाय धरतो व कांगावखोरपणानें डोळे पाण्यानें भरतो ) या असल्या घटनांनीं आपलाही विश्वास

उडायचा माझ्यावरचा. ओरडून सांगितलं म्हणजे खोटं देखील खरं वाटूं लागतं मालक. ईश्वरसाक्ष माझ्या हातून कांहीं पाप घडलं नाहीं.

**छोटूमल**—आमी अशा म्हनला का दिवानजी. कोनी काय बी म्हनला तरी तुमचेवर आमचा ईश्वास हाय. उठा, ते लंगड्या ज्योत्यानं केला काय हे समदां ? आमच्या पीशाबी त्येच्या भावानं आजून आनून दिला नाय्. दिवानजी, अशा काय करते ते ?

**दिवाणजी**—आपला उदारपणा धंद्याच्या हा असा नेहमीं आड येतो. शेटजी, आम्ही चाकरांनीं बोलूं नये. पण धडधडीत चूक दिसते ती सांगितल्यावांचून रहावत नाहीं. आपण कांहीं आपला पैसा धर्मार्थ वांटण्यासाठीं सांठवला नाहींत. आपल्याही पाठीमागें प्रपंच आहे. आपला देश सोडून, बरोबर एक लोटा घेऊन इथं आलांत तें कांहीं कमाई करण्यासाठींच की नाहीं ? छोट्या नथमल शेटजींना परमुलखांत आनंदांन आणि मानांनं राहातां यावं म्हणूनच चालला आहे ना आपला सारा खटाटोप ? आम्ही आपल्या अन्नाचे नोकर. आपणांला कांहीं सांगण्याशिकवण्याचा आमचा अधिकार नाहीं. पण खाल्ल्या घरचे दरवाजे सोन्याचे व्हावेत ही आमची इच्छा. दानधर्मही करावा. नाहीं असं नाहीं. पण हें काय ? निढळच्या घामानं मिळवलेला पैसा त्या हरामखोरांना सोडयचा ? बरं, त्यांना तरी या गोष्टीची कांहीं जाण ? तेंही नाहीं. पुन्हा त्यांच्या माना ताठच. त्या दिवशीं रानांत त्या लंगड्यानं मला मेरमेरेतों मार दिला. आणि आपण मात्र उदारपणानं त्याच्या कर्जाला कोर्टांत परत पांच महिन्यांची मुदत दिलींत.

**छोटूमल**—आमी चूक करेल तर तुमी सुदरेल दिवानजी. भरले मांडवमंदीं जसी न्यायची आमास्नी बरा वाटला नाय्. ते जिवबाच्या बायडीनं डोलां पान्यानं भरला. आमचाबी काळीजच हाय. माधवरावसारखा मोठा मानस मंदी पडला. ते वकील हाय. कायद्याची रेघ जाणता माणस, म्हणून दिली मुदत पर आजच मुदतीची आखीर दिस्! तरीबी त्येनी पीशा आनला नाहीं. आतां कडक उपाय करायला आमीबी डरत न्हाई. चला आपण दोघंबी तालुक्याला जाऊन त्येचेवर जप्तीचा हूकूम घेऊन येऊं. चार दाम ज्यादा खरचला तरीबी बेहत्तर हाय.

**दिवाणजी**—मला नका नेऊं ! मला ती सारीच गोष्ट आतां अशुद्ध आणि

अवघड होऊन बसली आहे. माधवरावासारख्या शहाण्यासुत्या माणसानं आपली पोर त्यांच्या घरीं दिल्यामुळें, जिवबापाटील व्याही झालेत ना आमचे! आमचाच दाम खोटा तिथं दुसऱ्यावर जळण्यांत काय हंशील? या कर्जवसुली प्रकरणांत मी पुढाकार घेतला तर माधवराव निष्कारण माझा शत्रू होईल. त्याला वाटेल-बघा! स्वतःच्या भाच्याला मुलगी दिली नाहीं—म्हणून हें आमच्या व्याह्यावरच उलटले—पण सल्ला म्हणून मी आपल्याला सांगतो शेटजी. आपण आजच्या आज तालुक्याला जाऊन जप्तीचा हूकूम मिळवा आणि रसातळाला पोचवा त्या मरगठ्ठयाला. माधवराव वकील आज गांवांत नाहीं. तो गेलाय कुठल्याश्या गांवीं सभा आहे तिथें. मोठे देशभक्त आहेत ना ते! करून करून भागला नी देवपूजेला लागला. बापजाद्यांनीं गरिबांचे गळे कापून घर भरलं. या माधवनंही आयुष्यभर वकिलीच केली. वकिली म्हणजे लबाडी आणि आतां म्हातारपणीं लागलाय् देशभक्ति करायला. जाच आपण तालुक्याला, प्रसंगीं लोखंडी साखळ्यांचे आहेर दिल्यावांचून या मरगठ्ठयांच्या हातून पैशाची फेड व्हायची नाहीं शेटजी! पिढ्यान्‌पिढ्या ओळखतों आहोंत आम्ही या लोकांना—

**छोटूमल**—पर आजच्या दिवस थांबेल तर बर म्हनते आम्ही. कां तर कायदाबी काय आमचे घरांतला नाय्. खेरीज त्यांचाबी थोडा उपकारच हाय् आमचे घरावर, आतां आमचा नथ्थू बिमार हाय त्येला त्येंच्या सुनेनं लईदा दवापानी दिला हाय. आज सक्काळींच तर येऊन गेली ती—

**दिवाण**—[ विकट हंसून ] हेंच, हेंच, मी म्हणतों तें हेच, आपण ओळखलंच नाहीं अजून या लोकांना. अहो शेटजी, खाण तशी माती आणि कापूस तशा वाती. ढोंगी बापाची ढोंगी लेक ती. आपल्या सासऱ्याला शेटजीनी आणखी मुदत द्यावी म्हणून त्या चाणाक्ष पोरीनं डाव रचलाय् हा!

**छोटूमल**—हॅ हे हे-! पोर हाय ती. तिच्या मनामंदी ये इक्ता इचार कुठून येल—?

**दिवाण**—अहो तिच्या नसला आला तरी तो लंगडा ज्योत्या आहे ना सूत्रधार—परमेश्वरानं त्याला लंगडा केलाय म्हणून ठीक, नाहींतर त्यानं आग लावली असती साऱ्या गांवाला! त्याची शिकवण आहे ना आंतनं त्या पोरीला—लग्न होतांच नवरा गेला लढाईवर. तिकडेच उलथेल तो! हिला

घरीं बसून धंदा काय आहे! असा उपयोग करून घेतो आहे तिचा. आम्ही नोकरांनीं काय सांगावं शेटजी. पण पांच महिने झाले तरी ते शब्द माझ्या कानाचा चावा घेताहेत अजून. तो लंगडा त्या दिवशीं धडधडीत आपल्याला साप म्हणाला साप!

**छोटूमल**—आमाला साप म्हनाला. ते कशाला म्हनाला? आमी शिवबाला पीशा दिला म्हणून? एळवर तेची बायकापोरास्नी जगवलं म्हनून? अरे वा! चांगलींच उपकारी माणसं हायीत. खरंच, आमाला साप म्हणाला त्यो लंगडा?

**दिवाण**—मला खोटं बोलून काय फायदा शेटजी? तो धडधडीत असं म्हणाला! आणि यावरून त्याची माझी बोलाचाली होवून त्यानं मला काठीनं मारलं! धन्याची निंदा मी उघड्या कानांनीं काय म्हणून सहन करीन? माझं डोकं फोडलं त्यानं! त्याच दिवशीं फौजदारी करणार होतों मी! पण म्हटलं जाऊं द्या! आमच्या माधवनं पोरगी दिली होती त्यांच्या घरांत! आपलेच दांत आपलेच ओठ! पाण्यांत राहून जळचराशीं वैर नको—पण शेटजी, आतां आपण मात्र गय करूं नका! अशा हजारांच्या रकमा बुडतील तर पेढी बंद करायची पाळी येईल आपल्याला. मग आपणच सांगा, छोट्या नथमल शेटजींनीं काय येतांना आपण बरोबर आणलेला लोटा घेऊन, आपलं काळं तोंड घेऊन, पुन्हा आपल्या देशाला परतावं?

**छोटूमल**—ठीक सांगितला दिवानजी! हे इक्ता आमासनी ठावं नव्हता. चला, सांगा सुभान्याला गाडी जोडायला!

**दिवाण**—सुभान्या, ए सुभान्या, (आंतून 'जी',) गाडी लौकर तयार कर शेटजींना तालुक्याला जायचं आहे. (आंतून 'व्हय् जी')

**छोटूमल**—देशोधडी भीक मांगत हिंडवल्याबगार वठनीवर नाई यायचा हे लोक.

**दिवाणजी**—हं मला असंच वाटतं. मी आपण आणखी पांच महिन्यांची मुदत दिली तेव्हांच सांगणार होतों.

**छोटूमल**—तवाच सांगीतला असता तरीबी ठीक होता दिवानजी, आमी तुमचा इमान लई वखत पारखला हाय. तुमी सांगेल तें आमच्या हिताचाच

सांगेल. आजच्या आज जावून आमी त्येंची चांगली व्यवस्था करून सांच्या-परी मागारी येल.

**दिवाण**—आतां बेलीफाला घेतल्याशिवाय येऊच नका शेटजी.

**छोटूमल**—ठीक हाय [ शेटजी लक्ष्मीच्या तसबरीला नमस्कार करतात. कपडे करूं लागतात, इतक्यांत सुभान्या गाडीवान आंत येतो. ]

**सुभान्या**—गाडी तयार आहे शेटजी.

**छोटूमल**—हां आलेच आमी. (सुभान्या जातो.) दिवानजी। नथूला कायबी सांगू नका ह्येच्यामधला. घोरपड्यांच्या समद्या मानसावर त्येचा लई जीव हाय्. शिवबा तर त्याचा साळसोबती हाय. त्येला दवापानी येळेवर द्या. सांजेपावतर आमी मागारीं येतेच. महिना झाला पोर लई बिमार हाय. त्येच्या मनाला काय लागल असं करूं नका. तालुक्याच्या डागडारलाबी येतांना घेऊन येल आमी-येतों तर.

**दिवाण**—या अन् फत्ते करूनच या. [ शेटजी बाहेर जातो, दिवाणजी परत येऊन कामावर बसणार, इतक्यांत छोटूमल परत येतो व हांक मारतो. ]

**छोटूमल**—ऐकलं काय दिवानजी, त्यो बावच्या धेड आज येल, काय घानवट ठिवनार हाय त्ये-ते बघून तेला पीशा द्या!

**दिवाण**—हें सांगायचं काय कारण! आपल्या गैरहजेरींत देखील घान-वटच्या किंमतीच्या चौथाई कर्ज दिलं असतं मीं!

**छोटूमल**—तशा नाय्. त्येच्या म्हातारा म्हातारी पंढरीला जानार हे वारी-साठीं. ते माजेपाशी रडत होता, त्येला आजच्या आज पीशा हवा हाय. ते देऊन टाका. गरीब हाय बिचारा. [ जाऊं लागतो. दिवाणजी परत आपल्या गादीवर येऊन बसणार इतक्यांत छोटूमल पुन्हा हांक मारतो व येतो ] दिवानजी—

**दिवाण**—( परत अदबीनं उठून ) काय शेटजी?

**छोटूमल**—तशा काय नाय्! चांगलवाडीचा पुनमा मारवाड्याकडला कोन आला तर त्येला व्हावून घ्या. नथ्थूची सोयरीक—

**दिवाण**—हों-हो-हो-हो! हें काय सांगायला पाहिजे? आपल्या या भरल्या

घराला खरंच कोणी तरी मालकीण पाहिजेच आतां! एवढी गडगंज लक्ष्मी गृहलक्ष्मीशिवाय उदास दिसते. बराय् शेटजी, त्यांना टेऊन घेतों आम्ही, हवं असल्यास बोलणंही करतों, काय मार्गीतले दहापांच हजार ठेवायला तर देऊन टाकूं! आपलं घर तरी उभं होईल. वा! वा! आनंद आनंद वाटला.

**छोटूमल**––बर मंग येते आमी. [ जातो. दिवाणजी परत आपल्या गादीवर कामाला बसणार, एवढ्यांत छोटूमल हांका मारीत येतो "दिवानजी ]"

**दिवाण**––काय शेटजी ?––

**छोटूमल**––तशा काय नाय्. काल ते बायजाबाई कारंडीनं येजाची रक्कम दिली हाय ना? ते जमा करायची ऱ्हायली. तेवढी जमा करून टाका, तिजोरींत एका कोऱ्या पाकीटमंदि हाय. आठरा रुपये पंधरा आणे.

**दिवाण**––बराय् त्याची नका चिंता करूं! उन्ह होईल. आपण निघाच आतां!

**छोटूमल**––बर तर जाते आमी. [ जातो. दिवाणजी त्याला पोंचवीत बाहेर जातो, व एक मिनिटांत परत येतो. त्याच्या गैरहजेरींत अशक्त झालेला नथूमल हळूंच येऊन बाहेर डोकावून जातो. त्याच्या चेहऱ्यावरून त्यानें दिवाणजींचें व शेटजींचें सर्व भाषण ऐकलं आहें असें दिसतें. दिवाणजीशीं कांहींतरी बोलावे अशी त्याची इच्छा असते. पण न बोलतांच तो आंत जातो. जातां जातां नथूमल घडयाळाकडे पाहतो, व स्वतःशींच म्हणतो "सव्वा दहा वाजले सईबाई येतीलच आता." दिवाणजीची चाहूल लागतांच परत आंत जातो. दिवाणजी किल्ली घेऊन शेटजीनीं सांगितलेले पैसे काढतो; व ते नीट मोजून घेऊन पक्कया कीर्दीवर लिहून घेतो.]

**दिवाण**—बायजाबाई कोम कृष्णा कारंडी १८ रु. १५ आणे शके १८६६ चे व्याजादाखल जमा-खाते पान-[ एवढ्यांत लीला येते; व सरळ आंत जाऊं लागते. ]

**दिवाणजी**—अहो! आंत काय काम आहे ?–

**लीला**—कां ?

**दिवाणजी**—कां म्हणजे ? छोटूमल शेटजींचं घर म्हणजे कांहीं गांववेशीवरचं मारुतीचं देऊळ वाटलं होय तुला ?

**लीला**—हो वाटलं. 'गृहस्थाचं घर आणि परमेश्वराचं मंदिर' दोन्ही सारखीच पवित्र नाहींत कां ?–शेटजी नाहींत वाटतं घरांत !

**दिवाणजी**—नाहींत ! कां ? सासऱ्याचं कर्ज फेडायला आलीस कीं काय ? आण कीं रक्कम ! मी घेतों जमा करून. त्याला शेटजीच कशाला पाहिजे ?

**लीला**—सासऱ्याचं कर्ज फेडायला सासरे समर्थ आहेत. माझ्याशीं काय त्याचा संबंध ?

**दिवाणजी**—काय संबंध म्हणून कसं मागेल ! त्याच्या मुलाशीं लग्न लावलं आहेस ना तूं ? तो गेलाय् लढाईवर उलथायला !–आतां तूंच नाहींस का तुझ्या सासऱ्याला मुलाच्या ठिकाणीं ? धांवत पळत आलीस तेव्हा म्हटलं माहेरचे पैसे घेऊन आलीस वाटतं सासऱ्याला कर्जमुक्त करायला ?

**लीला**—माझ्या माहेरच्या पैशाची गरज नाहीं त्यांना परमेश्वरानं त्यांना पुरून उरेल इतकं दिलं आहे.

**दिवाणजी**—म्हणूनच आजपर्यंत एक कवडीही परत करतां आली नाहीं ! दरीद्री लेकाचे ! मिश्रविवाहच करायचा होता तुला तर एखाद्या पैशेवाल्याशीं तरी संबंध करायचा होतास हो ! म्हणाले तरी असते लोक कीं तुपासाठीं उष्टं खाल्लं म्हणून. [ हें वाक्य कानीं पडल्याबरोबर अशक्त झालेला नथुमल वाऱ्यासारखा बाहेर येतो. ]

**नथू**—दिवाणजी, काय बरळतां आहांत हें ? लहान वयांत कस्तुरबा गांधींच थोर मन मिळवलेल्या यां देवतेला अपशब्द बोलताला तुम्हाला शरम नाहीं वाटत ? तुम्ही माणूस आहांत कीं जपानी ? शेटजींच्या गैरहजरींत मी तुम्हांला हुकूम करतों. जा ! चालते व्हा ! जा जा येथून ! आजपासून तुमच्या नोकरीची गरज नाहीं आम्हांला जा जा जा. सईबाई, [ तिचे पाय धरतो ] माफ करा मला—माझ्यासाठीं या नीच माणसाची तुम्हाला बोलणीं खावीं लागलीं. आपल्यासारख्या थोर अंतःकरणाच्या देवतेचा अपमान झाला—म्हणा क्षमा केली आहे म्हणून. त्यावांचून उठणार नाहीं मी !

**लीला**—शेटजी, काय हें भलतंच ! तुमच्या अंगांतली अशक्तता अजून कमी झालेली नाहीं. चला उठा, मला माणसांचीं मनं समजतांतं. दिवाणजी वृद्ध आहेत, बोलायचेच. कांहीं नवीन पाहिलं कीं सनातनी डोकीं बिथरतात, त्याला त्यांचाही नाइलाज आहे. त्यांच्यावर रागावूं नका. त्यांना क्षमा करा.

चला आंत जाऊन स्वस्थ पडा. दिवाणजी हें औषध यांना द्या! आणि शेटजी आल्यावर त्यांना सांगा कीं, उद्या तालुक्याच्या गांवीं डॉ. भडकमकर नांवाचे थोर डॉक्टर येणार आहेत. धन्वंतरी आहेत ते. त्यांना आणवा. विसरूं नका. नथमल तुम्ही स्वस्थ असा—

**नथमल**—सईबाई—

**लीला**—अंहं अजीबात बोलूं नका. प्रकृतीवर परिणाम होईल त्याचा. जा! आंत जाऊन स्वस्थ पडा.

**नथमल**—आइ–आई–आई [ फीट आल्यासारखी होते. दिवाणजी त्यांना सांवरतो ]

**लीला**—त्यांना आंत नेऊन झोपवा. डोक्याला ताण पडला आहे आणि मात्र इथं कसलीही गडबड होऊं देऊं नका. जातें मी! सांभाळा बरं—— [ लीला जाते. नथमलला दिवाणजी आंत नेऊन झोपवितो. लीला जातांना त्याच बाजूला बावऱ्या महार येतो. तो तिला वांकून मुजरा करतो. ]

**बावऱ्या**—जोहार!

**लीला**—कोण बावऱ्या? इकडं कुणीकडं रे?

**बावऱ्या**—काय नाय्, इकडं जरा शेटजीसंगती काम व्हत जी!

**लीला**—कर्जबिर्ज काढीत नाहींस ना? काढूं नको हो कर्ज.

**बावऱ्या**—ह्यॅं, ह्यॅं, कर्ज कशाला काढतुया! आपल्या पायाच्या पुन्याईनं काय कमी हाय जी मला?

**लीला**—जाऊं मी?

**बावऱ्या**—व्हय् जी! [ लीला जाते. बावऱ्या तिच्या पायाची धूळ मस्तकाला लावतो. एवढ्यांत बावरलेला दिवाणजी येतो. जरा कुऱ्यांतच दिवाणजी बोलतो. ]

**दिवाणजी**—अलीकडे कुठें येतोसरे महारड्या? थांब तिथंच वहाणेपाशीं! कायरे घोरपड्यांच्या घराकडे कामाला जातोस नाहीं का? मग त्यांच्या त्या लंगड्या जोत्यानं आणि फुटाण्या सुनेनं गुरुमंत्र दिला असेल तुला! त्यांच्या घरांत शिवाशिव वगैरे कांहीं विधीनिषेध नसेलच ना?

**बावऱ्या**—न्हाईजी, त्येंच्याकड काय न्हाई त्यें. अक्षी: देवमानस आहेत तीं. पोटच्या पोरावानी जपत्याती म्हारापोरास्नी—

**दिवाणजी**—जपतील तर काय झालं!–त्यांना कुठें जात राहिली आहे आतां. अरे, महारसुद्धां त्यांना आपल्यांत घेणार नाहींत.

**बावऱ्या**—ह्या ह्या! असं कोन म्हनेल जी? सारा म्हारवडा देवावानी मानतोय् ज्योतिकाकासनी.

**दिवाण**—होय कां? मग त्यांच्याकडेच कां नाहीं गेलास पैसे मागायला? कर्जाची, घाणवटाची इथें हवी होती कशाला वाटाघाट अं?

**बावऱ्या**—त्येनी मस्त दिलय आतां पावतर अन् हातनं म्होरंबी देत्याल. ऊस गोड लागला म्हनून काय मुळासकट खावा का दिवानजी? चार दीस गेल्यावर मिळतीलच त्येंच्याकडच पैसं रोजगाराचं ( दागिना फेंकतो. ) बगा त्यो दीड तोळ्याचा हाय.

**दिवाण**–(डाग हातांत घेतो. त्याला कस लावतो.) बावऱ्या हा डाग कुठून आला तुझ्याकडे? चोरा! कुठें तरी डल्ला मारला असशील. जा, मी खात्री करून घेतो. हो, नाहींतर चोरी करून मोकळा झाला असशील तूं आणि फांस यायचा आमच्या गळ्याला– जा! उद्यां ये म्हणजे पैसे देईन! जा—!

**बावऱ्या**— उद्यां घिऊन काय करायचं हाय जी मला? म्हातारा-म्हातारी पंढरीच्या वारीला जानार हाईत उद्यां. पायी पायी जान्याचा न्येम हाय त्यांचा. त्येंच्या वाटखर्चाला होवंत पैसं. बारकंचिरकं कारन असतं तर कारभारनीच्या गळ्यांतलं डोरलं घानवटीसाठीं आनलं असतं व्हयू म्यां दिवानजी?

**दिवाण०**— तुझ्या बायकोच्या गळ्यांतलं डोरलं का हें? म्हणजे म्हारांच्या बायकासुद्धा सोन्यामोत्यांचे दागिने घालायला अं? जा चालता हो! बरा सांपडलास. खरं सांग बावऱ्या, हें कुठून चोरलंस रे हें?

**बावऱ्या**— पांडुरंगाशिपथ चोरलं न्हाई देवा. कां नसता आळ घेतांसा गरिबावर! घोरपड्याच्या गौराईनं आमच्या लग्नांत अहेर म्हणून दिलं न्हव.

**दिवाण०**— घोरपड्यांचं कर्ज त्यांच्या डोक्यावरून गेलंय. ते तुला दीड तोळ्याचा सोन्याचा जिन्नस अहेर म्हणून घालतील होय रे महारड्या? दीड तोळा पितळ तरी सांपडेल का त्यांच्या पडक्या वाड्यांत? चोरीचा माल—

बावऱ्या— चोरीचा माल न्हवं द्येवा. पंढरीरायाची पायरी चढून सांगन ह्यो डाग मला गौराईनं दिलाया. चोरीचा न्हव. चोरीचा असता तर परगांवला जाऊन गप्‌शान इकून टाकला आसता म्या. गांवात अन् घानवटेच्या वाटंला कशाला गेलों असतों जी ?

दिवाण०— अरे वा ! म्हणजे चोरीचा माल हजम करायचे मंत्रही चांगलेच पाठ दिसताहेत तुला—जा ! हा जिन्नस असूं दे इथं ? संध्याकाळीं सरकारी माणसं आलीं कीं त्यांच्यापुढें ठेवतो लेका हे तुझं पाप—

बावऱ्या—(संतापून) दिवानजी, मुकाट्यानं माझा जिन्नस म्हागारा द्या ! नाहीं तर—

दिवाण०— नाहीं तर काय करशील रे म्हारड्या ?

बावऱ्या— काय करशील ? बरगड्या मोडून ठिवीन खुट्टीवर ! दिवानजी ! मुकाट्यानं माझा जिन्नस म्हागारा द्या !

दिवाण०— कुणाला भिती घालतोस रे ?

बावऱ्या— तुला, गादीवर बसलास म्हणून शेटजीचा माव आला व्हय रं तुला ? मुकाट्यानं माझा जिन्नस दे.

दिवाण०— देत नाहीं जा—

बावऱ्या— देत न्हाई ?— [मारायला धांवून जातो. एवढ्यांत शेटजी, ज्योति, जिवबा येतात.]

छोटूमल— अरे बावऱ्या, अशा काय पिशालास तूं ? काय झाला ?

बावऱ्या— बघा कीं शेटजी, ह्यो दिवानजी माजा जिन्नसबी मागारा देत न्हाई अन् पैकाबी देत न्हाई (जिवबा व ज्योति आल्यावर बावऱ्या जोहार करतो.)

ज्योति०— काय रं बावऱ्या, कां ओरडतोयुस बेंदरांतल्या खोंडागत ?

बावऱ्या—काकासाब, सुगी न दुकाळ आमां म्हारड्यांसनी सारखाच. घरांत चूल पेटायची मारामार हाय, पर तुमासूनी ठाव हाय माझं आईबाबा नानांच्यागतच पंढरीचं वारकरी हाईत. आतां येनाऱ्या कार्तिकीपार्यी तेस्नी जाया व्होवं, तेस्नी वाटचालीपुरतं तरी पैसं द्यावंत म्हून—

दिवाण०—कुण्या भरल्या घराचा दागीना चोरून आणून घाणवट ठेवणार होतों. सांगा कीं आपला पराक्रम आपल्या गुरुदेवाला.

**बावऱ्या**—आईच्यानं चोरीचा न्हवं. काकासाब आपल्याला ठाव हाय गौराईनं आमच्या लग्नांत आयेर म्हून एक डोरलं दिलं व्हतं.

**ज्योति०**—अर पर सटवीच्या, पैक्यासाटनं सवाष्णीच्या गळयांतलं डोरलं मारवाड्याकडं घानवट ठिवायला—गांवतला मराठवाडा अन् बामनआळी काय पेटली व्हती व्हयू ? तीतं मिळना का तुला पैका ? कां असं मारवाड्याच्या कर्जातच मरनार हाईसा सारीजनं ? [दिवाणजीस] कुठाय् रे त्येचा डाग ? [दिवाणजी भीत भीत डाग काढतो. ज्योतिबा तो पाहतो.] खरंच कीं ! ह्ये तर आमच्या वैनीन ह्येच्या बायकोला दिल्यालं डोरलं. मोठा शानाच दिसतोयास. जा. येडा कुठला ! [ज्योतिबा तो दागिना दिवाणजीकडून काढून घेऊन बावऱ्याच्या अंगावर फेकतो. दिवाणजी गर्भगळीत उभा राहतो.] तुझी बायको आली व्हती वैनीकडं, तिला दिल्यात पैसं. जा.— पाठीव जा म्हातारा म्हातारीला पंडरीला. अन् हें बघ, आमच्या जिवबाचा माळ-बुक्काबी वाहयला सांग त्यास्नी !

**जिवबा**—मग काय शेटजी ! आमास्नी धरनं आनायापायीं चालला हुता न्हवं तालुक्याला ? [जाऊं लागलेला बावऱ्या हें वाक्य ऐकून चमकतो व थबकतो. दिवाणजीचें त्याच्याकडे लक्ष जातें व तो खेकसतो.]

**दिवाण०**—कां रे, तूं कां थबकलास ? जा कीं आतां आल्या वाटेनं.

**ज्योति०**—बावऱ्या, हातंच कां तूं अजून ? जा पाटवनी करनार हाईस न्हवं आज म्हाताऱ्यांची ? मग जा कीं बिगी बिगी.

**बावऱ्या**—व्हयूजी ? निघालोंयाच न्हवं कां ह्यो ! [कांहींतरी ठरविल्या-सारखं करून निघून जातो.]

**जिवबा०**—व्हयू शेटजी, तालुक्याची कां वाट धरलीसा ? आमा गरिबास्नी चिरडायपायीं व्हय ? तुम्ही आमच अन् आमी तुमचं— सर-कारांत कां जात हुतासा मंग ?

**छोटूमल**—तर मग काय करेल ? मुदत खल्लास झाली तरी तुमी आमचा पीशा देल नाय् ! सरकारामंदी जाऊंने तर काय करावा ? तुम्ही सरल वठनीवर येत न्हाई तर आमी तुमचा घरदार इकून पीशा वसूल करेल [दिवाणजीस] ह्येंच्या मळयावरनं गाडी जात होती, ह्येनी हटकला. म्हनाले, येवस्ता करतो म्हागारी चला !

**जिवबा**—व्हयू, मग करतु न्हव येवस्ता! दोन हजार रुपये देतों. तेवढ्यांत तोडून ध्या. शेटजी, मुळची रक्कम साहाश्याची, कागद हजाराचा न् आतां ह्ये चार हजार म्हनतासा? आमच्याकडबी बगा कीं वाईच आतां दोन हजार या घटकला मोजतों.

**दिवाण०**—वा. वा. हा खासा हिशोब! चार हजारांची रक्कम इथें मोज आधीं.

**ज्योति०**—तूं गप्प बस रं वाईसा. मग शेटजी, मिटवून घेतासा का कसं?

**छोटू०**—ते कायबी चालनार नाय. लई वर्सं थांबले त्येचा हें इनाम काय? ये घटकला येजा सुद्धां समदा पीशा चुकता करा. नाहींतर आमी तुमच्या घरावर जप्ती आनेल.

**दिवाण०**—वेळ पडली तर तुरुंगाचा सुद्धा दरवाजा दाखवावा लागेल. —कसं मालक?

**छोटू०**—हां, हां, तेमंदीं काय वांदा हाय? हें धंदा हाय बाबा—

**जिवबा**—छाः, छाः, तसं काय करूं नका शेटजी. पोरगा लडाईवर गेलाय, त्येचं येत्यात पैसं. आनखी वर्सांभरांत पुन्हा शैंपांचर्शे दीन पर गारिबाचं घर राखा.

**छोटू०**—तसली मिठ्ठी बोली कायबी सुनवूं नगा आमाला. तुमचेजवळ पैका येनार न् तुमी आमाला देनार— आतांपावतरचा अनुभव हायच की.

**ज्योति०**—ये छोटूमल, पयलं दिस गेलं आतां. या लडाइनं पारडं उलाटलंयू आतां. तवा पैक्यासाठीं शेतकऱ्याला धांवावं लागत हुतं. आतां पैका शेतकऱ्याच्या मागं पळतुया. पैक्याला कुत्राबी इचारत न्हाई—

**छोटू०**—पर आमी इच्यारतो. आतां आमी कायबि नायू ऐकेल. आमचा सारा पीशा या वख्ताला दिवूनश्यानू टाका—चुकता करा—

**ज्योति०**—म्हंजे कुत्र्यापक्षीबी हलकी मूक हाय म्हना की तुमची. अरं, पैक्याला म्वाल न्हायलं न्हाई आतां या लडाइनं. आमचं जुंदळ तांदुळच मोलाचं झाल्यात. तूं म्हनचील तिकता पैसा हां हां म्हनतां फेकुन देऊं आमी. पर वाईच् मानुस्की धर. जिवबा म्हनतो तेवढं जमा कर न् फाड कागुद.

**छोटू०**—ते कायबी ऐकायचा नाय् आमास्नी. ये वक्ताला आमचा समदा पिशा लाव. काय दिवानजी–

**दिवाण०**—हो तर ! प्रकरण म्हणजे– तसं म्हणजे– मुदतीच्या आपलं है. बाहेरच जातय् नाहीं तर. – त्यांतून या शेतकरी लोकांना आजकाल कुणाचीच पर्वा नाहीं. माजले गुलाम. वाटेल तें बोलतील पण करणीच्या नांवान आवळ्याएवढं पूज्य.

**छोटू०**—शमजला काय जिवबा पटेल. साराच्या सारा पीशा लाव. नाय् तर आमी तुमचा निशंतान करेल. ऐकनार नाय. पीशा काय तुमाला देन्यापाई साटवला नाय्. आमच्याबी पोरबाळ हाय.

**जिवबा**—म्हनूनच सागतोंय न्हवं. मीबी पोराबाळांचाच धनी हाय. असं नागवूं नगासा. तुरूत हें दोन हजार घ्या. उरल्यांतली काय सूट द्या गरीबाला. शे पांचशे म्होरल्या साली भरतों. त्येचा नवा कागुद लिवून द्या होवा तर. एवढी भीक घाला. [धोतराचा पदर पसरतो.]

**छोटू०**—ते झोलीमंदी धोंडा पडेल. आतां तुमी कायबी म्हनेल तरी थांबाय जागा नाय्. पीशाबिगार आमी कायबी ऐकून घीनार नाय्. हे तुमच्या भावाला माहीत आहेच.

**ज्योति०**—व्हय् चांगला माहीत केलयास मला. पर माझा म्हाताऱ्याचा सराप भंवल एक दिशीं तुला. तांब्या न् झोळी घेऊन इथं जगाय् आलास न् गांवची लक्ष्मी घशाखालीं घालून बसलास. जेनी तुला आन घालून जगवलं त्येंच्या घरादारावरनं तूं गाढवाचा लांगर फिरवलंस. मरतांना काय पैका संगतीं घेऊन जानार हाईस काय पाप्या ?–

**छोटू०**—उगाच जीभ लांब करून तूं आमाला सुनवूं नको. आमी तुजेसंगती बोलत नाय्. साप म्हनतो काय आमाला ? साप डसून परान घेतल्याबगार राहेल न्हाई, डाव धरतो. हायना जिवबा पटेल ? तुमाला भीक मागायला लावेल आमी. तुझीं पोरबाळं देसोधडीला लागलीं तरीबी आमाला पर्वा नाय.

**ज्योति०**—ए, मुकाट्यानं त्यो देतोय् ते पैसे घे अन् कागद फाडून दे. आमच्या गांवांत राहयचं हाय न्हवं तुला ? आमचं घर तूं बुडवतोस का तुलाच आमी माती चारतों तें बघन मी ! उंद्या तुलाबी यावं

लागल आमच्या दारांत ! पैसं खायला उपेगी पडत न्हाईत. सारा गांव नाडलास तूं. कोनबी तुझ्या उपेगी पडायंच न्हाई. इंदर-देवाचा राजा त्येलाबी भीक मागावी लागली मग तूं कंच्या चिझंचा पाला ! बरं झाली ही लडाई आली. तुमा सावकारांची घमांडी वैशी उतरंल आता. सरकारनं चहूंकडन धान्य याला बंदी केलीया; बघूंया कितींदी साठवनाच्या पान्या-वर जगतायसा त्यें.

**छोटू०**—अरे लई कशाला बक्वा करते ? भिकारी साला ! आमच पीशा देत न्हाई ?–

**ज्योति०**—जिवबा, फेक की र तेच्या थोबाडावर हायत्ये पैसे—

**न्दिवाणजी**—हो, हो, कर कर पाहूं एकदां तसा तरी विक्रम–(जिवबा पैसे फेकूं लागतो एवढ्यात माधवराव येतात.)

**माधव०**—थांबा ! शेटजी सांगतील तेवढे पैसे देऊं नका–

**दिवाण०**—कां? कां! कां रे ? कां देऊं नका ?–

**छोटू०**—हां–हां काय झाला ?

**माधव०**— (शांतपणें) सांगतों शेटजी, सहाशेंची रक्कम देऊन तुम्हीं हजाराचा कागद लिहून घेतलात ! त्याची खुशाल चौपट केलीत अन् आतां जप्तीच्या धमक्या दाखवून तुम्ही या गरीब शेतकऱ्यांना लुटतां काय ? पण शेटजी, ही गोष्ट न्याय्य नाहीं. निदान आजच्या काळांत तरीं हा खटाटोप तुमच्या अंगाशीं आल्यावांचून राहणार नाहीं.—

**छोटू०**—तें कशा ? तुमी वकील त्येच्या पावना झाला हाईसा म्हनून काय ? अरे, अशा कायद्याचा ग्यानी लई पायलेत आमीं. हेंनीं तुमाला वकीलपत्र दिल्यावर मंग काय तें बोलूं. अरे तुमी भले माणस. आमच्या धंद्याच्या आड येऊं नका— [माधवरावांना पैशांची लालूच दाखवितो.]

**माधव०**—आड येऊं नका कसं ? आड आलंच पाहिजे मला ! जिवबा पाटील, यांना खुशाल जाऊं दे न्यायालयांत. तिथं होईलच कीं निकाल. बावऱ्यानं मला घाईघाईनं येऊन सांगितलं म्हणून,– आतांच गांवाहून आलों मी– नाहीं तर हा वेळपर्यंत यांनीं तुमचे पैसे पचवलेही असते. छोटूमल रक्कम खरी किती येणं आहे, नी तुम्ही वसुली काय नघे कशी करतां आहांत ? कांहीं तारतम्य ?

**छोटूमल**—तुमाला आमीच समदा येव्हार सांगून फसले हाय. आतां तुमी आमाला दाटनारच. पन ध्येनामंदीं ठेवा—आमी लागेल तितका दाम खर्च करून बंबईचा बालीस्टर आणेल अन् ये मरगठ्येस्नीं भिकेला लाविल—काय समजलेत ?

**माधव०**— हेंच समजलों कीं नुसत्या दंडुकेशाहीशिवाय दुसरा कसलाही कायदा तुम्हाला माहीत नाहीं. या शेतकऱ्यांना सावकारी पाशांतून सोडवण्याचं पुण्य साधण्यासाठीं नव्हे तर कर्तव्य बजावण्यासाठीं मला कायद्याची कक्षा धरणं भाग आहे !

**छोटू०**—हां, तो कायदेबाजी करून काय आमचा वाटूळा करायचा असल तें करा.

**माधव०**—वाटोळं मला कुणाचंच करायच नाहीं. मी तुम्हांला एवढीच सूचना देतों कीं, हें प्रकरण न्यायालयांत गेलं तर तुम्हांलाच शेकेल—

**दिवाण०**—तें कसं ? न्यायखात्यांतही कुणी जिवबांचे व्याहीच आहेत वाटतं ?

**माधव०**—थांबा गोपाळतात्या. उगाच भलतीकडे जाऊं नका. लढाईवर गेलेल्या माणसाची जिम्मेदारी सरकारवर आहे. शिवाजीराव लढाईवर गेले आहेत. त्यांच्या गैरहजेरींत तुम्ही त्यांचा जमीनजुमल गिळंकृत करूं शकणार नाहीं. वाजवी दाम तुम्हांला मिळतीलही पण हप्ते बंदीनं. पण मग त्याला कोर्टच कशाला हवं ? तें आपसांतही होऊं शकतं काय ?

**छोटू०**—व्हय् ! पर आम्हांला आतां आपसामंदीं कायबी कायबा कराचा नाय. आमीबी काय मेलेल्या बकरीचं दूध पिऊन जगलें नाय्. काय व्हायचा तें होऊं द्या ! पर आमी ह्यंच्या घरावर न मळ्यावर—

**माधव०**—तो विचारच सोडा. उलट तुमचीं अशींच आणखी कांहीं अजब प्रकरणं उघड्यावर येतील आणि हातकड्या मात्र पडतील—

**छोटू०**—(संतापून) हां पडूं दे हातकड्या, हेंच वकीलपत्र घेऊन कोर्टीमंदीं या भांडायला—

**जिवबा**—तसं कशाला ? पर ह्ये दोन हजार दियाला कबूल हाय न्हवं मी ह्ये घ्या.

**ज्योति०**—व्हय, व्हय, घे ते. देनं न् दुखनं होवं कशाला घरांत ? घे ते पैसं. फाड बघू कागद; सोडून दे तुंबी म्हादव—

**माधव०**—सामोपचारानंसुद्धां तुम्ही एवढी रक्कम कां गमावतां ?

**छोटू०**—तेवढी रक्कम ? तेवढ्या रकमेवर थुंकते आमी ! जा काय करायचा असल तें करा—आमीबी बघेल काय होतो तो—

**जिवबा**—तसं कां पर थोडक्यासाठीं ?

**ज्योति०**—थोडक्यासाठीं कसं ? निढळच्या घामाच दोन हजार याच्या तिजोरींतल्या लाखाच्या मोलाच हाईत. चल, एक दमडा देऊं नग त्येला. काय हुयाचं त्यें हूंदे. चल. बराय् शेटजी.

**छोटू०**—(संतापून) हां. या, या.

**ज्योति०**—चल जिवबा. चला म्हादेवराव. (जातात)

[संतापानें लाल झालेला छोटूमल इकडे तिकडे संतापाच्या भरांत फेऱ्या घालतो.]

**छोटू०**—दिवानजी, लई खरं शांगला तुमी. हे माणस शरल नाय्.

**दिवाण०**—पण हें आतां पटलं आपल्याला. अहो, हे वाईट, नीच लोक आहेत. त्यांचे सारे बेत पूर्वीच ठरले असतील हे ! आपण आत्तांच्या आत्तां तालुक्याला जा.

**छोटू०**— व्हय. पर आतां वकील मंदीं पडला. दिवानी दावा रेंगाळत राहील. पीशां वसूल होईल तवा खरं. दुसरा कायबी इंगा दाखवाय होवा. फौजदारी कराय् होवी—[अस्वस्थ व संतप्त.]

**दिवाण०**—[डोकें खाजवून आनंदानें] हां. आहे एक उपाय शेटजी—

**छोटू०**—मंग बोला—

**दिवाण०**—आपण उद्यां एकट्या जिवबाला आपसांत सारं मिटवण्यासाठीं बोलवायचं. तो देईल तें घ्यायचं. तो परत जायला निघाला कीं कदमाच्या वाडींत द्यायला म्हणून, त्याच्याकडे एखादा मूल्यवान् जिन्नस द्यायचा—आणि तो हा जिन्नस चोरून नेतो आहे अशी पोलीसपाटलांना वर्दी द्यायची; अन् मुद्देमालासह चोर पकडयचा. पुरावा पैशानं विकत घेतां येतो. हातोहात हातकड्या—

**छोटू०**—हां दिवानजी, अशाच करूंया—(हंसतो) चांगला चांगला इलाज काढला. हरामखोराला तुरुंगांतच मरान येऊं दे.

**दिवाण०**—म्हणजे पैसेहि हातीं आले आणि त्यांना प्रायश्चित्तहि झालं. खरूज आणि खोकला एका औषधानं साफ.

**छोटू०**—वाः ! तारीफ तारीफ आहे दिवानजी तुमच्या अकलेची. ठरला. मंग अशाच करायचा.

**दिवाण०**—पण शेठजी, पोलीसपाटलाचा हात आपण आगाऊच दाबलेला बरा !

**छोटू०**—हां. जातेच आमी. [एवढ्यांत आंतून आजारी नथमल बाहेर येतो. शक्य तेवढ्या ताकादीनें ओरडतो **नथू०**— थांबा— ! बडे शेठ कुठे चाललांत ? शेठजी आश्चर्यानं वळून पाहतो.]

**नथू०**—बडे शेठ, मी मघापासून सारं ऐकतों आहें. राहवेना तेव्हां उठून बाहेर आलों मी !

**छोटू०**—नथ्थू, तुला बरा वाटताय ना थोडा आज ? मंग आमी थोड्याच एळांत जाऊन येते.

**नथू०**—थांबा, थांबा, बडे शेठ. आपण या नीच दिवाणजीच्या बुद्धीनं कारस्थानं कसलीं चालवलीं आहेत ? ज्या घोरपड्यांच्या घराण्यानं तुमचा मुलगा आत्तांपर्यंत तरी जगवला त्या घराला आग लावायची भाषा बोलतां ? बडेशेठ, हें तुम्हांला शोभत नाहीं.

**छोटू०**—नथ्थू, ये धंद्याच्या गणीतमंदी तुला एवढ्यांत काय कळणार नाय.

**नथू०**—मला धंदा कळत नसला तरी कृतज्ञता कळते. बडे शेठ, मी तुमचा एकुलता एक मुलगा. लहानपणींच आई वारल्यामुळं तुम्ही एकटेच मला दोघांच्या ठिकाणीं आहांत. माझं तुमच्यावर प्रेम आहे त्याच्या शतपट तुमचं माझ्यावर आहे याची मला जाणीव आहे. मी श्रीमंत व्हावं म्हणूनच तुम्ही हा सारा खटाटोप करीत आहांत. मग थांबा. घोरपड्यांच्या कर्जाचा हिशोब मी तोठणार आहें. हा एकच व्यवहार मी थोडा अकेळीं हातीं घेणार आहें. बडे शेठ, तुमचा मुलगा आम्हांला आजवर लाभूं देणाऱ्या

देवमाणसांना छळून तुमच्या पोटच्या गोळयाच्या मारेकऱ्याला जवळ करूं नका!

**छोटू०**—(चमकून) मारेकरी? कोन मारेकरी?

**दिवाण०**—अरेरे! यांना भ्रम झाला आहे.

**छोटू०**—नथ्थू, कोन मारेकरी? काय म्हनालास?

**नथू०**—(दिवाणजीकडे बोट दाखवून) हा मारेकरी! बडे शेठ, याच्या नीचपणाची तुम्हांला कल्पना नाहीं. आजारीपणामुळें मला झोपेशिवाय रात्रं-दिवस इथं शेजारीं पडून राहावं लागल्यामुळं याचीं असंख्य कृष्णकारस्थानं मला कळलीं आहेत. हरबाची हंसळी नक्की यानंच गिळंकृत केली असली पाहिजे; कारण मळयांतल्या भिवाची दुकानबाकी वीस रुपये असतांना यानं चाळीस सांगून वीस माझ्यादेखत खिशात घातले. बिचाऱ्या बावऱ्याला नाहक परत पाठवला—

**दिवाण०**—काय बोलतां हें छोटे शेठ?

**नथू०**—चूप! एक अक्षर बोलूं नको. बडे शेठ, हा अत्यंत नीच मनुष्य आहे. ब्राह्मणाच्या तेजस्वी ज्ञातीला कलंक आहे. याच्या नीच-पणाची पराकोटी मला माझ्या मरणापूर्वी एकवार तुमच्या कानीं घातलीच पाहिजे. बडे शेठ, नीट लक्ष देऊन ऐका. आपल्या पश्चात् आपली सर्व संपत्ति मला मिळणार म्हणून याला वाईट वाटलं. मी याला शत्रूसारखा दिसूं लागलों. माझा कांटा दूर व्हावा, मी झिजून झिजून मरावं, म्हणून यानं प्रत्यक्ष तुमच्या पोटच्या मुलावर विषप्रयोग केला आहे.

**दिवाण०**—छेः छेः! यांना निश्चित भ्रम झाला आहे. डॉक्टरांनाच ताबडतोब बोलावलं पाहिजे.

**नथू०**—(बेशुद्ध होतां होतां) मी पूर्ण शुद्धींत आहें. बडे शेठ, तुम्ही मात्र शुद्धींत या!

**छोटू०**—(कोसळत्या नथूला सांवरीत) नथू, आतां डोक्सा फिरून गेला. काय करूं? दिवानजी, तुम्ही— नथु— अरे काय झाला काय हें? शारी दुनिया माझ्याभवतीं गरगर फिरायला लागली. दिवानजी—तुम्ही माझ्या नथ्थुला जहर पिलवलंत? चालते व्हा—चालते व्हा माझ्यापुढून—

**दिवाण०**——ठीक आहे. खऱ्याची दुनिया नाहीं हेंच खरं! जातों मी. या किल्लया! [जानव्याच्या किल्लया काढून फेकतो. त्या नथ्थूला लागतात. तो डोळे उघडतो. दिवाणजी तणतणतच जातो.].

**छोटू०**——नथू—[नथू वडिलांना बिलगतो.]

---

# अंक तिसरा

[घोरपड्यांच्या वाड्यांतील अंगणात तुळशीओट्यावर घरांतील सारीं मंडळी. लीला गाणें म्हणत आहे. सर्वजण आनंदानें व तन्मयतेनें ऐकत असतात. जिवबा-ज्योतिबांचे डोळे तर आनंदानें फुलारून आलेले आहेत. लीलाचें गाणें संपतें न संपतें तोंच पाल चुकचुकते. गौराई एकदम दचकते]

त्या ओढ्याच्या पैलथडीं
अेक असावी झोंपडी ॥ धृ० ॥
गारवेलींचें कुंपण भंवतीं
रानजाइचा माण्डव पुढती
विश्रांतिस्तव त्याच्याखालीं खाट एक लांकडी १
निंबाखालीं अेकच रांजण
सारवलेलें समोर अंगण
बसुनि त्यावर चाखूं संगें भाकरीची गोडी २
नको जगाचा विषयी वारा
कलहांना ना येथें थारा
सोबतीसाठीं घेऊं संगे हरिणी मात्र तेवढी ३

**लीला**——अगबाई ! सांजवात लावायची वेळ झाली. [ती आंत जाऊन नीरांजन घेऊन येते. तुळशीला ओंवाळून गाते.]

सुटला ग सांजवारा, भरे सुगंध अंगणीं
आभाळाच्या मंदिरांत, आली पहिली चांदणी.
स्वर्गांतल्या गंधर्वांनीं, आळवितां दीपराग
हळू हळू अुजळेल, लाख पणत्यांची रांग,
तुळशीच्या वृंदावनीं, लावीतें मी सांजवत
माझ्या सोनेरी सौभाग्याचें, गोड गोड गीत गात.

**गौराई**—किस्न, किस्न, किस्न, सोन्याची वाचा.

**जिवबा**—कां ग, एवढी बावरलीस कां ?

**गौराई**—धनी, म्हनत्यात त्ये काय खोटं न्हवं. मन चिंती तें वैरी न चिंती. प्वार एवढ ग्वाड गानं म्हणाली देवाधर्माच, आज एकादशीच ! पर माझ्या डोक्शात काय एगळच आलं.

**ज्योति०**—तेंच काय आलं म्हून इच्यारतों न्हवं ?

**गौराई**—[डोळ्यांला पदर लावीत] नग ग बाई. अशा कातरएळला बोलूं कशाला वाईट वंगाळ ? डोक्शांत आलं तेला वळचणींतल्या सवतीनं हुकार दिला. नगर देवा नग त्यो इच्यार दिकून नगो.

**लीला**—अहो पण असं झालं काय ?

**गौराई**—पोरी, आपुन हित बसतुया रानांतल्या चिवळावानी गात बागडत पर तकडं साता समींदराच्या पल्याड माझा शिवबा कुठं असंल या वक्ताला ? न्हाई न्हाई तें मनांत येऊन काळीज हादरतया माझं. सरकार-कडनं पैस येत्यात तेवढाच त्येच्या खुशालीचा आधार. वाईट वंगाळ ग बाई ही पलटणींतली नौकरी.

**ज्योति०**— एडीच हाय. त्यो काय मामाच्या घरला पावना गेलाय् म्हून तुला रोज खुशाली कळवील ? हाताव शीर घेऊन लडाईव गेल्याला मरद. चार वार करील दोन झेलील. कंदी रक्तानं न्हाईल तर कंदी

दुसऱ्याच्या रक्ताचं शिंपनं करील. सरकारला जय मिळतुया असं म्हनत्यात न्हवं समदी ! उंद्या येईल माझा शिवबा तकडन इंग्रजी बेंडाच्या तालावर खाडखाड बूट वाजवीत. गप, उगा न्हाई त्येची काय फिकीर करावी मानसानं ?

**गौराई**—दाजीबा, आईचं आंतडं बोलतया ह्ये !

**ज्योति०**—अर व्हय, पर मरदाच्या आईचं आंतडं हाय् ! एकादा यल्लामाचा मानकरी न्हाई जलामला तुझ्या कुशींत. रानांतली वाघीन कंदी आपल्या बच्चाची काळजी करती व्हय ? जाईल तथं शिकार करूनच माघारी याचा तो. मरान कसं ईल त्येच्या वाट्याला ? त्येला काय रानांतलीं हरनाचीं पोरं मारत्याल व्हय कवळं गवत खाल्यालीं ? ही पोरगी नवी न्हवरी ! ती करतीया का बघ कुरकुर ? अन् तूं केल्याधरल्याली बाई ! असं काय न्हाई त्यें मनांत आनतीयास ? पुस ते डोळं.

**गौराई**—सई शिकल्यासवरल्याली धीराची प्वार हाय्. मी थकलेंय् न्हवं आतां ? दाजीबा, जलमभर लढाईच चाललीया न्हवं आमचीबी ! उतरतं वय झालं ! आतां न्हाई सोसवत काई ? बारक्या चिरक्यांनींबी काळीज फाटतया.

**लीला**—सासूबाई, तसं कांहीं होणार नाहीं. काकांच्याप्रमाणें माझीही खात्री आहे कीं एके दिवशीं संध्याकाळीं आपण सारेच या तुळशीओट्यावर बसलेले असूं; दूर अंतरावरून बँडपडघमचे आवाज ऐकूं येऊं लागतील; घोडदळाच्या पायधुळींत संध्याकाळच्या सूर्याची प्रभा भिसळून, साऱ्या खेड्यावर गुलालाची उधळण होईल; एक डौलदार घोडा आपल्या वाड्याच्या रोखानं धांवत येईल; तो उमदा घोडेस्वार मोठ्या प्रेमानं हांक मारील आई–आई. [कल्पनेनेंच प्रसंग डोळ्यासमोर आणून गाऊं लागते.]

परतेल शिपाई माझा, लेवुनि साज विजयाचा
होईल धन्य ही माता, फिटुनिया पांग डोळ्यांचा

**गौराई**—अन् त्यो माझा शिवबा असल न्हवं पोरी ? तुझ्या तोंडांत पेढा इरघळूंदे ! [इतक्यांत हरबा धांवत येतो.]

**लीला**—काय रे हरबा, पेढे घेऊन आलास कीं काय ?

**हरबा**—न्हाई सईबाई. कारभारनीच्या लई पोटांत दुखाय् लागलया.

अक्षी माशागत तडफडतिया. चला. सारखा आठव काढतीया तुमचा. म्हनतीया सईबाईसनी बोलवा–सईबाईसनी बोलवा. न्हाई तर वांचत न्हाई मी. चला– चला बिगी बिगी.

**लीला**––खरंच ? अरे मग लवकर नाहीं यायचं सांगायला ? बिचारी रखमा अडली नमली म्हणजे मिळवली. सासूबाई, जातें अं मी ! आलेंच मी माझी बॅग घेऊन. [बॅग घेऊन येते व घाईनें हरबाबरोबर जाते.]

**ज्योति०**–– [तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे लांबवर पाहत.] लक्ष्मी हाय माझी सई ! सारा गाव मानतोया तिला. कैक मरत्यास्नी जलम घातला. बोलनं तर इक्तं ग्वाड हाय पोरीच कीं माझ्यासारख्या म्हाताऱ्या-लाबी ऐकत रहावसं वाटतं. मिरगाच्या धाराच बरसत्यात जनूं झिमझिम्. परवा गमतीनं म्यां म्हटलं– तुझ्या सासूसासऱ्यालाबी शिकव वाईच् 'शिरीगनें' कराया– तर चेरा अगदीं शांत करून म्हनतीया काय– 'त्यांस्नी म्यां काय शिकवावं– लई शिकायचं हाय मलाच त्येंच्याकडनं.'

**जिवबा**––[आनंदानें] व्हयू ? लई हुशार आन् जानती पोरगी ! सोधून काढाय गेलं तरीबी काई वावग दिसायचं न्हाई तिच्यांत ! आन घराऱ्याचा केवढा अभिमान ! आपुन घोरपडे म्हनून सांगतांना डोळं कसं टप्पुरं करतीया भोकरावानी.

**गौराई**––इक्तं असूनबी रितीला, येव्हाराला चुकायची न्हाई. माझ्या संगतीं सैंपाक करूं लागतीया अन् ह्यंच्यासंगं भजनबी करतीया. भल्या पाटंचा कोंबडा वराडतांच उठतीया; सडा रांगोळी करून जातीया महार-वाड्यांतल्या पोरास्नी आंघुळी घालाया. कामालाबी दम न्हाई तिच्या. अवं, येवढी शिकल्यासवरल्याली, मोठ्या घरची प्वार पर हालकीं कामं कराया लाज न्हाई वाटत तिला. गाडीघोडं पाठवून याच्या न्हाईत त्या, आसपास-च्या गांवांतल्या चाकरमान्यांच्या बायका, हिच्या भंवतीं म्हवळांतल्या माशावानी घोंगावत्यात. चावडींत कुना गांधीमानसाचं भाषान झालं तर मधल्या खुर्चीवर आमची सई– !

**जिवबा**––अन् तूं कुठं बसली व्हतीस ?

**गौराई**––यो बया ! मी व कशाला जातीया ततं ? मी आपली बसलेंते पाटलाच्या पडवीला– काय कळतंया आमाला त्यांतलं ?

**ज्योति०**—न कळाया काय कानडींत बोलत व्हता व्हयू त्यो गांधीचा मानूस ?

**जिवबा**—काय तरीच बोलनं तुझं जोत्या. घर आनी रान यापल्याड काय समजतया आमच्या बायकास्नी ? कां आपली सून शानी गांवली म्हून तिच्यासंगतीं सारं घरदारबी शान झालं तुझं ? तीबी मस्त शानी हाय. चाळीस वर्सांच्या संसारात कैकदा वैताग आला मला. घरदार सोडून डोंगरांत जावंसं वाटलं पर तिच्या तोंडावरलं हांसू कंदीं मावळलं न्हाई, कां कंदीं कपाळाला आठी पडली न्हाई. गरीबीच्या संसारांत सोनं पिकवलं तिनं. घोरपड्यांच्या घरान्याचा मान माझ्या कारभारनीनं संभाळलाय. गौराई नसती तर आज दीस दिसलं असतं कां जोत्या आपल्याला !

**ज्योति०**—अर येड्या, बायकूच्या तोंडांव तिची तारीफ करूं नये शान्या मानसानं.

**गौराई**—तुमचं भजान आटपतासा न्हव आतां ? आज एकादशी न्हवं का ?

**जिवबा**—अरं व्हयू कीं !

**ज्योतिबा**—बायकूच्या गुनाम्होरं पंढरीरायालाबी इसरत व्हतास—व्हयरं माळकऱ्या ?

**जिवबा**—पर बायकूनच आनला न्हवं सुद्धीव ? हांकडं घे टाळ ! ज्योति, सुखादु:खांत कंदी इसरलों न्हाई बरं मी माझ्या इटोबाला ! वाडवडलापासनं चालत आल्याली ही तुळशीची माळ शिव्याच्या गळ्यांत घालायची तवाच इना खालीं ठेवायचा. द्येवाला इसरायला त्येनं काय वाईट केलंयू माझं ? पडत्या इजंखालीं संगत देनारी गौराईसारखी कारभारीन, वाघाच्या जबड्यातनंबी ध्याई वडून काढील असा तुझ्यासारखा भाऊ, घरान्याच नांव साऱ्या दुनियेंत गाजवील अस शिव्यासारखं प्वार अन् सईगत द्येवगुनाची सून—आनखी काय व्होवं मला ? [गौराई टाळ आणून देते.]

**गौराई**—(पांडुरंगास उद्देशून) त्यैंची किरपा, आंधळ्याच्या गाई त्योच राखतो, त्येला भजून खाल्लं कीं शिळवाळलंबी ग्वाड लागतं. दुख गिळायला धीर येतो अन् समदकिडं सुखच दिसायू लागतं.

**जिवबा**—खरं हाय् तुझं म्हननं कारभारनी. आवंदा तर इट्टलानं लई चांगलं दिस दावलं. असा सुकाळ आपन जलमल्यास बघीतला न्हवता. अग, गुळाला सोन्याचा भाव आला न् भात चाळसानं इकलं चाळसानं–

**गौराई**—एवढं नग काय हरकून टुम्म व्हायला, सावकाराचं देनपानी फिटून काय पदरांत पडल तवा खरं.

**ज्योति०**—सावकाराच देनपानी? त्येच त्येला द्याया गेलोतांच कीं पर त्यो बसला अडून. चार हजार रुपय एका रकमनं मागतोय् त्यो. माधवराव बघतो म्हनाल्यात. वाजवी दाम देऊन टाकूं त्यांचं. आतां उरल्या जिनगींत मारवाड्याचं पाडरं पाय लागूं द्यायच न्हाईत ह्या घोरपड्याच्या वाड्याला.

**जिवबा**— आतां कशाला येतोय् त्यो टकलीचा हिथं? कोडतातच म्हाळ व्हईल त्येचा. त्येचं देनं भागूनबी, उरलं हाईत त्या पैक्यातनंच एक पुतळ्यांची माळ न् कोल्हापुरी साज करावा म्हनतोय तुला कारभारनी.

**गौराई**—यो बया! मला व कशाला दागिनं या उतरत्या वयांत? गळ्यांतलं हें डोरलं अन् कपाळाचा मळवट जल्माला पुरला म्हंजी पांडुरंग पावला. सईलाच करा काय तें.

**ज्योतिबा**—हं! सई कुठं घालतीया दागिनं? पांढरी कापडं घालतीया ती अहिल्याबाई होळकरनीवानी! म्यां कालच इच्यारलं तिला तर म्हनाय् लागली 'तेवढं पैस म्हारतीच्या देवळाला दिऊन टाका.'

**गौराई**—अगो बया, ह्ये देवाधर्मांचबी याड कवा शिरलया तिच्या डोक्शांत?

**ज्योतिबा**—देवधरम कसला आलाय् कपाळाचा? गांवात सभा–बैठकीला जागा व्होवी म्हनतीया ती शेरांतल्यावानी.

**गौराई**—झालं! लागला का तिलाबी घोरपड्यांच्या घरान्याचा दानतीचा रोग? काय नग देवळाला देयाला. खिंडीम्होरल्या मळ्यांतल्या तालीच काम बघा अदुगर! चार वर्सं अशीच धारन राहिली तर बांधू म्हारतीचं देवाळ, कसं वं?

**जिवबा**—व्हयू तर काय!

**ज्योतिबा**--'व्हय्' काय रं बायल्या ? गांवच्या कामाला पैसं गेलं तर बिघाडलं तुझ ? इक्त चांगलं दीस देवानं दाखीवलं त्यें ! का पैसं हातीं आल्याव तुमी बि झाला मारवाडी ? मग त्या छोटूमललाच कशाला शिव्या घालाय व्होव्या ? पैका असला कीं मानसाची दानत फिरतीया जनू ! तें काय न्हाई, शिव्या घरीं येस्तोर ते पैसं सरकारी रोक्यात गुतवायचं नी त्यो मागारी आला कीं येजासुद्धां म्हारुतीच्या देवळाला देऊन टाकायचं. आपली जिंदगी दुसऱ्यासाठीं लावली पोरानं न् देवाधर्माच्या कामाला चार पैसं फेकतांना, काचकूच करतां व्हय् र तुमी तेचं आईबाप ?

**गौराई**—बर, पन त्येच आत्ताच काय ? भजान आटपतासा न्हवं अदूगर ?

**जिवबा**—अरं व्हय कीं ! [अभंग म्हणूं लागतो. अभंगाचे दोन चरण संपतात न संपतात तोंच शेजारून आक्रोश हंबरडे ऐकूं येतात. जिवबा अभंग म्हणायचा थाबतो. ज्योति सांगतो, 'भजन थांबवूं नको. काय झालंय् मी बघून येतों.' ज्योति जायला निघतो तों दारांतच त्याला बावऱ्या दिसतो.]

हरी तुझें नाम, गाईन अखंड
यावीण पाखंड नेणें कांहीं
अंतरीं विश्वास अखंड नामाचा
कायामनेंवाचा देई हेंची
तुका म्हणे आतां देई संतसंग
तुझे नामीं रंग भरो मना

**ज्योति०**— काय र बावऱ्या, काय झालंय् ? आरडा कसला ?

**बावऱ्या**—जाधवांचा शिरपती लढाईत पडला म्हनं धनी—

**ज्योति०**--शिरप्या ? अरारा. वंगाळ झालं ! आमच्या शिव्याबराबरच फलटनींत गेला हुता त्यो ! [चिंताक्रान्त होतो व जाऊं लागतो तोंच बावऱ्या लिफाफा पुढें करतो.]

**बावऱ्या**--तालुक्याच्या बाजारांत डाकवाल्या बामनानं ही तार दिलीया आपलीबी—

**जिवबा**--[एकदम घाबरून] तार ? आन बघू हांकड ! [बावऱ्या तार जिवबाच्या हातात टाकतो. जिवबा थरथरत्या हातांनीं ती फोडतो. ती अर्थात् इंग्रजींत असते.]

**ज्योति०**--कसली असल रं ? ही तार इंग्रजींत हाय. ती काय वाचायला तरी येनार हाय व्हय आमास्नी ?

**गौराई**--[एकदम कपाळावर हात मारून] अरं देवा, दुसरी कसली असतीया तार ? ऐकलसा, [बाहेरूँ पिंगळा बोलल्याचा आवाज] पिंगळाबी बोलतुया न्हवं बाहीर ? दाजीबा, कारभारी, काय झालं असल वं माझ्या पाडसाचं ?

**जिव०**—त्याकिंदी तार कसली येतीया या खेड्यांत ? ज्योत्या, कशाला रं पाठवलास माज्या पोराला लडाईव ? बावऱ्या. तार दियाच्या अदुगर डोक्शांत कुऱ्हाड कां न्हाई घातलीस रं माझ्या ? एकुलता एक पोरगा गेला, ज्योत्या, आता कुनासाठनं जगायचं रं ?

**गौराई**—दाजीबा, आता कां गप्प उभा राहिलासा ? सांगा, सांगा, कुठं गेला माझा शिवबा ?— शिवा— बाळा, या म्हातारपनीं काय एळ आनलीस रं ? कारभारी, दाजीबा, सांगा--सांगा, पहिल्याच्यानं माझं न ऐकतां कां लडाईवर धाडलासा माझ्या पोराला ? कां ताटातूट केलोसा गाईची आन् वासराची ?

**बावऱ्या**—पर धनी, तार विंग्रजींत हाय न्हवं ? सईबाई कुटं हाईत्या ? म्यां चटशीर बलावून आनतो त्यास्नी. त्यास्नी विंग्रजी वाचाय् येतं न्हवं ?

**जिव०**—व्हय्. बुडत्याला काडीचाच आधार ! जा बावऱ्या —हरबा पिसाळाच्या घरीं गेलीया ती. तिला यातलं कायबी सांगूं नग. म्हणावं तांतडीनं बलीवलय्. जा—

**बावऱ्या**—जी.

**ज्योति०**—(दुःख आवरून) थांब बावऱ्या ! आडल्याली बाळातीन सोडवाया गेलीया ती. नग आनूस तिला बलावून. आपलं बरोबरीला आल्यालं प्वार गेलं. दुसऱ्याचं जलमतं बाळ तरी वाचवूं दे तिला— (बावऱ्या माघारी येतो.)

**गौराई**—दाजीबा, कसं वं एवढं थंड तुमी! माझं प्वार—माझं प्वार शिवा, शिवराया, शिवबा—तस्सं डोळ्यासमोर उबा हाय् त्यो!—हात आखडल्याली ती उघड्या गळ्याची पैरन, कमरंला जाम बसल्याली ती अर्धी तुमान, व्हट्टाव कवळं मिसरुड—शिवा—शिवा—आता कोन रं मोटव गानं म्हनील! झांजड पडल्यावं, आई, तूं थकलीस, आतां काम पुरं कर असं कोन रं सांगंल?—गुनाचं माझं प्वार—जातांना माझ्या संगतीं खोटं बोललास न्हाई?—म्यां म्हटलं, शिव्या, म्या म्हातारी झालेय थोडं काम केलं कीं सांधं धरतात; तर मला म्हनला, 'म्हागारीं आल्याव मी अन् सई दोघं जोडीन पाय चेपूं तुझं.' कंदी खोटं बोलत न्हवतास—त्यो माझ्यासंग—आपल्या आईसंगं— खोटं बोललास व्हयृ? शिवबा—शिवा, दाजीबा, कारभारी, सांगा सांगा कुठाय माझा शिवबा?—

**ज्योति०**—वैनी, हें काय भलतंच, येड्यावानी, छातीवर गोळी घेऊन मेलेल्या मर्दाच्या आईला असला भेकडपणा सोबत न्हाई! पूस त्ये डोळं! देवान दिलं—देवानं नेलं. लडाईत मानाचं मरान आलं. आपल्या कुळाचा उद्धार झाला. आतां कां रडायचं? ऊठ. त्यो बग—बावऱ्या भुकाजल्या असल—चालून आलाय् चार कोस—त्येला जेवायू वाढ—काय असेल त्ये. जा बावऱ्या. वाईच् तुकडा खाऊन घे!

**बावऱ्या**—काय हें धनी? अशा वक्ताला तुकडा जाईल व्हय मला? राजासारखा राव सोडून गेला गांवाला, अन् पोटांत तुकडं भरत बसू व्हयू मी? न्हाई धनी! या घोरपड्याच्या घरावरच असल्या म्हागाईत जगलायू आमचा म्हारवडा. वैनीसाब, एडा म्हना मला—म्हारडा मी—मला काय त्यांतलं गिन्यान खरं? पन—पन—मला अजून न्हाई वाटत कां त्या तारंत तसलं काय वाईट वंगाळ लिवल्याल असलं. काकासाब, सई-बाईच्या वडलास्नी—माधवरावास्नी तरी घेऊन येतो मी हातं—

**ज्योतिबा**—बावऱ्या, ही तारच घेऊन जा! बिगी बिगी म्हागारा ये—जा! [जिवबा तार देतो. बावऱ्या निघून जातो. क्षणभर शांतता. पार्श्व-संगीत वाजत आहे. एवढ्यांत दरवाज्यांत जिवबानाना अशा दोनतीनदां हांका ऐकूं येतात.]

**जिवबा**--ह्यें कां आलय् जित्तं घुबाड ? आल्या पावलीं म्हागारीं जा म्हनावं त्येला; वाकड्या एळलाच जत्ती आनायचा शिरस्ता हाय त्येचा. गाडगीं मडकीं बाहीर काढायूलाच आला असंल त्यो. मागारा जा म्हनावं त्येला.

**ज्योतिबा**—तसं म्हनून कसं भागंल ? घरीं आल्याला मानसाचा पानउतारा करूं ने ! काय नशीबांत असल त्ये हुईल. या शेटजी–

**जिवबा**—[रागांतच] कां वाट वाकडी केलीसा ? एकलंच बरं ? संगतीं बेलीफ न्हाई का ? खुशाल घिऊन जा भांडीं कुंडीं न् पैसंबी व्होवं तर ? मला कुनासाठनं ठिवायच हाई आतां त्ये ?

**छोटूमल**—अर तशा काय नाय्– दुसरेच कामासाठीं आलेय् आमी तुमच्याकडे.

**जिवबा**--तुमां सावकारांचं पाय कशासाटनं लागायचं हाईत आमच्या घराला ? जप्तीला न्हाई तर वसुलीलाच यायचं कीं तुमी !

**छोटूमल**—अरे, उगाच चिडीवर येते तुमी ? आमचा काम दुसराच हाय तुमचेपाशीं.

**जिवबा**--काय असल त्ये बोल चटक्यान अन् चालता हो माझ्या घरांतनं ! तुजं खापरागत त्वोंड अश्या एड्या वक्ताला माझ्या नंदरसमोर नग.

**छोटूमल**--जिवबा पटेल, आमचा पोरगा नथ्थु लई बिमार हाय– बिछानला खिळून पडला हाय.

**जिवबा**--मंग मी काय डागदार का वैद म्हनून माझ्याजवळ आलाईस ?

**छोटूमल**--अरं अशा काय करतां ? तुमी सरळ बोलतच न्हाई.

**जिवबा**--सरळ ? आजपावत तूं बोलत व्हतास का सरळ ? आई बा उद्धारल्याबिगार बोलाया येत हुतं का तुझ्या जिभंला ? सरकारच्या अन् कायद्याच्या आड दडून माझ्या घरान्याची अब्रू ढानकाला लावायचा कैकदा घाट रचलास तूं– पर यस न्हाई आलं तुला !

**ज्योतिबा**—अरं जिवबा, त्यो म्हनतुया तें ऐकून तर घिशील ? शेटजी, आज आमची कोनाचीच डोक्शीं ठिकानावर न्हाईत. तुमचं काय काम निघालंय् एवढ्या सांजचं ?

**छोटूमल**—ज्योतिबा, माझा पोरगा लई बिमार हाय. तुमचे सईबाईनीं शांगितला म्हून मोठे डागदारलाबी दावला; पन कुनाचाच काय चालला न्हाई. लई वाया गेलाय प्वार. भात मागतोय. तुमचे तालींत भात पिकतो अशा त्येनच शांगला. म्हनाला तुमी जिवबा पटेलकड जाऊन चावल घेऊन या. न्हायतर मी कायबी खानार न्हाई. नथ्थु माझा एकुलता एक प्वार हाय. त्यो वाचल अशा डागदार सांगत न्हाई. त्येची मरती इच्छा तुमच्या शेतांतला भात खान्याची हाय. तेवढ तांदूळ द्या. मरत्याचें मुकांत घाला. गावांत कित्तीबी पीशा दिला तर तसला चावल मिलत नाय्! मरत्या मुखांत घांस घाला!

**जिवबा**—मरत्याच्या तोंडांत? अरं मरू दे कीं तुझा पोरगा! तूं अन् त्यो दोघंबी मेलासा तर गांवची कीड गेली. म्हन, मरत्याच्या मुकांत घाला! माझं पाळण्यांतलं प्वार घटका मोजत व्हतं, तवा तूं निसत्या याजा-साठीं माझ्या दारा धरनं धरलंस– पदर पसरून तुझ्या लाख इनवन्या केल्या– पर माळावरच्या दगडा, तुला पाझर फुटला न्हाई! अभद्या, आज माझ्या घरांत तादूळ मागाय् आलास? माझा वाघासारखा पोरगा लढाईत मेला अन् ह्यो म्होरत बघूनच तूं आलाईस् न्हाई भीक मांगायला?

**छोटूमल**—काय म्हनते? तुमचा शिवबा गेला? जिवबा पटेल, आतां माजा नथ्थू? जिवबा, तुमचा बरोबरीचा पोरगा लडाईमंदीं गेला; अन् माझा पोरगा– अरेरे– मरतांना त्येच्या मुकांत घालायला मला तांदूळबी मिळत नाय्. साठवून ठिवल्याला पीशा काय करायचा हाय?

**जिवबा**—ह्ये आतां कळलं व्हय् तुला निलाजऱ्या?

**छोटूमल**—लई उशीरा माझे ध्यानामंदीं आला. पटेल, दोगावरबी अवघड वखूत आलाय्. तुमचा मुलगा गेला पर माजा पोर तुमी चार दिवस तरी वांचवेल. थोडा तांदूल घाला. लई वाईट वखूत! ये परि-स्थितीमंदीं मी तुमाला मांगू ने पन माज्या एकूलत्या एक पोरासाठीं तुमचे पाय धरते. [तसें करतो.]

**जिवबा**—अर सोड! पायां पडन्याच्या निमतानं साखळ्या काढून घेनारी जात तुमची. आजपावतर यमासारखा माज्या घरीं आलास. अन् आज भीक मागाय आलास त्योबी आमाला पोटच्या पोराच्या सुतकांत गांठून.

चांन्डाळा, चालता हो हिथून. भात काय भाताची तनूसडीबी मिळणार न्हाई तुला. जा–जा–चालता व्हो ! चालता व्हो !

**छोटूमल**—अरं, पर माज्या मरत्या बाळासाठीं—

**जिवबा**—जा म्हणतो न्हवं ? जा– जा– न्हाई तर– (रागानें दांतओंठ खात शेटजीला मारायला धांवतो. मारणार इतक्यात कोंपऱ्यात रडत बसलेली गौराई एकदम पुढें येते.)

**गौराई**—कारभारी, हात मागं घ्या !

**जिवबा**—कां मागं घ्या ? अनायासानं सपाटीव घावल्याला सापाला जिता सोडतं कां कुणी ? कैक वर्सं ह्येनं माझ्या घरान्याला कीड लावली–ह्येला जीत्ता कशापायीं ठेवूं ? ज्योत्या, दे रं त्याला दाडवान गवसून दोन वादाडं. तुझ्या जिनगीची ह्येनं ह्येनंच धरमसाळा केली न्हवं ? गप काय उभा ऱ्हाईलास ?

**ज्योतिबा**—थाब ! जीवबा, तसं बोलूं नको. त्योबी आपल्यावानीच दुःखात हाय. त्येच्या उपेगी पडलं पाहिजे आपून या वक्ताला.

**जिवबा**—(पुन्हा शोकमग्न होतो) काय झालं रं हें जोत्या ? माझा वाघासारखा गडी गिळला या लडाईनं—

**गौराई**—कारभारी, डोक्सं फुटून याड लागायची पाळी आलीया. मलाबी काय सुचनासं झालंया.

**ज्योतिबा**— वैनी, नाना, शिव्या गेला त्येच्या पाठूपाठ आपुन समदी गेलों तरीबी बेहेत्तर हाय. एवढ्या समद्यांच्या मरनाचं ग्वाल दिल्यानबी, लडाई नसती तर ह्यो मारवाडी आला असता का आपल्या दारांत भीक मागाय अशी भिकेची करटी घिऊन ? बरोबरीला आल्याला तरनाताठा पोरगा या लडाईत मेला खरा, पर या लडाईनंच घरान्याचं मोठेपनबी ह्येंच्यासारख्या पैकवानास्नी कळलं. ह्येंच्या बैठकीखालीं लाख रुपयं कीड लागून पडल्यांत, पर त्येच्या मरत्या पोराच्या तोंडांत घालायला तांदळाचा कण न्हाई त्येच्यापाशीं. या लडाईनं समद्या जगाला आग लावली. मुलुखच्या मुलुख खाक झालं खरं पर येवढ्या मोठ्या होमानं का होईना आमा शेतकऱ्यांची किंमत कळली या पैकवानास्नी. या लडाईच्या सांवल्या यमाच्या सांवलीगत पसरल्या असत्याल समद्या दुनियेवर. पर

पोटाच्या आगीनं तळमळनाऱ्या आम्हा हिंदी शेतकऱ्यास्नी मातुर थंडगार सांवली दिली या लडाईनं. आवंदासारख दिस गेल्या सात पिढ्यात दिसलं नसत्याल कुना शेतकऱ्याला.

**जिवबा**—काय पेटवायचं हाय व्हय या सुगीला? कुनासाठनं ठेवायचं हाय कमवून? या लडाईनंच गेला माझा शिवबा— ज्योति—बाहीर काढ या मारवाड्याला— ह्यंचं पाय म्हणजे यमाचं पाय हाईत. माज्या पोराच्या सुतकांत तेच पाऊल नग माझ्या पायरीला.

**गौराई**—थांबा!

**जिवबा**—तूं कोण मला सागनारीन?

**गौराई**—उन्हापावसात तुमच्या सांवलीपरमानं तुमच्यासंगं राह्यल्याली तुमची घरधनीन. शेठजी, पोराच्या मरनानं आमची कुनाची डोक्सीं सुद्धीवर न्हाईत. तुमच्या दुःखाव उगीच डागन्या दिल्या आमीं! थाबा! [जिवबा, ज्योति पुतळ्यासारखे स्तब्ध उभे आहेत. गौराई जाते व थडीच्या अलीकडील एका चुमड्याचें तोंड सोडून सुपानें त्यातले तांदूळ बाहेर काढते.] कारभारी, निसता हात लावा या सुपाला. पंढरीचं माळकरी तुमी. तुमचा हात म्हणजे परत्यक्ष पाडुरंगाचा हात. आजाऱ्याला व्होवा हाय यो तादूळ. धनी, लावा म्हणतें न्हवं हात—

**जिवबा**—[हात लावतो व गहिवरतो] कारभारनी—

**गौराई**—घ्या शेठजी, मनात काय येडं वाईट आनूं नगा. परत्यक्ष इट्टलानं यो तादुळ दिलाय् अस समजा. घ्या, बघता काय असं दाजीबाकडे?

**ज्योतिबा**—अरं घे, अन् पाय धर त्या माऊलीचं. [तो तसें करूं लागतो.]

**गौराई**—पायां दाजीबांच्या पडा— घरधन्यांच्या पडा. सोताचं दुख गिळून मानसानं दुसऱ्याचं दुःख कमी करायू झटलं पाहिजे. ह्यो दाजीबांचा उपदेस हाय. [तादूळ घालते.]

**छोटूमल**—[खिशातून कागद काढून तें गौराईला देत] हे घ्या तुमच्या कर्जाचा कागद. तालुक्याला जायचा म्हून खिशामंदीं बाळगला मी पगल्यानं. फिटला माझा पीशा. येजासुद्धां फिटला.

**गौराई**—गुन्हाळावर रसाच पैस घेत नसत्यात. शेटजी, कागुद

न्हाऊंदे तुमच्यापाशीं. आमी कुनाचंच पैसं बुडवणार न्हाई. आज ना उद्यां म्हागारा दिऊं. तुमच्या ल्येकाला म्हनावं—घोरपड्यांच्या शेतांतली जीरं साळ हाय ही—निढळ्या घामाचा तांदूळ ह्यो. येवढा खा. चार दिसांत बरा व्हशील. उदंड औक्षाचा व्हो ! माझी सई बाहीर गेलीया. सकाळच्या पारीं तिला पाठवून दीन. औषधपानी करील ती.

**छोटूमल**—अरे गौराबाई, तुमी माणस न्हाई, देव हाय देव. आना त्यो कागद आमीच फाडून टाकते. [भावनेच्या भरांत तसें करतो व गौराईचे पाय धरतो.]

**ज्योतिबा**—जा ! आजची एळ ध्यानांत धर. मराठ्यांच्या मुलकांत न्हाऊन, मराठ्यांचं अन्न खाऊन—मराठ्यांची दानत आज तुझ्या अंगांत आली. तुझा पोरगा वाचूं दे. कागूद फाडलास तरीबी तुझं देनं आनून दिऊं आमीं. [छोटूमल जड पावलानीं जाऊं लागतो. इतक्यांत नाचत बागडत लीला प्रवेश करते. तिच्या हातांत पेढे आहेत.]

**लीला**—हरबानीं पेढे पाठवले आहेत काका. जुळीं झालीं त्याला. [मोठमोठ्यानं हासूं लागते. तिच्या हंसण्याबरोबर ते तिघेही हुंदके देऊं लागतात—तशी ती बावरते.] मामंजी, सासूबाई, काका, काय—काय—झालं काय झालं ?

**गौराई**—पोरी, तुझं कपाळ फुटलं——

**लीला**—म्हणजे ?

**ज्योतिबा**—काय न्हाई कपाळ फुटलं. तुझ्या कपाळींचा टिळा हिन्या-माणकाचा झाला. माझा लाडका शिव्या लढतां लढतां मेला—

**लीला**—खरंच ? कशावरून ? कुणीं सांगितलं ?

**जिवबा**—तार आलीया तकडनं. पोरी, तुझ्या नशिबांत सुखच नव्हतं ग !

**लीला**—कुठाय् ती तार ?

**जिवबा**—बावऱ्या घेऊन गेलाय् तुझ्या बापाकडं.

**लीला**—बाबाना दाखवायला ? त्यांना काय वाटेल ती तार वाचून ? (रडते) झालं सुरवातीपूर्वीच शेवट झाला. परमेश्वरा, हाच काय तुझ्या घरचा न्याय ! वीरा, शिवराया, डोक्यावर मंगलाक्षता पडल्या. पुरोहितांनीं 'सावधान'

म्हटलं. जिवाच्या परमेश्वरा, आनंदानं आपला दणकट हात माझ्या हातीं दिलात–तुमचे डोळे म्हणत होते–लीला, आता चल हासत आयुष्याची वाट चालूं–पण हें काय हो केलेंत? सप्तपदीच्या सात पावलातच आपण आपला प्रवास आटपलांत. आता या अफाट जगात मी कुठं जाऊं? कुणीकड जाऊं? आता पुढं काय? शिवराया–आता पुढं काय?–अंधार! कुणास ठाऊक किती काळचा अंधार–अंधार–अंधार [माधवराव प्रवेश करतात.]

**माधवराव**—खरंच, काय अंधार–किती भयंकर काळोख आहे बाहेर! पण हा बावऱ्या काय ऐकतो थोडाच? त्याला आनंदाचं वेड लागलंय्. तस्सा अंधारात घेऊन आला मला. दिवा घेईतों दम नाहीं त्याला.

**लीला**—(आश्चर्यानें) म्हणजे?

**माधवराव**--(तार पुढें करीत) ही तार वाच ना म्हणजे कळेल?

**लीला**—(तार वाचताना रडत असलेली एकदम हंसूं लागते.)

**ज्योतिबा**—आं? काय हाय ग तारंत?

**लीला**--(एकदम हंसत) आम्ही नाहीं सांगणार --

**जिव०**--ही चेष्टा काय भलत्या एळला?

**लीला**--चेष्टा तुम्हीं केली माझी. अहो मामंजी, तुमच्या चिरंजीवांना व्हिक्टोरिया क्रॉस मिळाला.

**जिव०**--मंजी रं?

**माधव०**—व्हिक्टोरिया पदक मिळालं!

**ज्योति०**--माझ्या शिवबाला हिक्टोरिया पदक?

**लीला**--हो, हो! तारेंतल्या इंग्रजीनं सारा घोटाळा केला हा! ज्योतिकाका तुमची हौस फिटली.

**ज्योति०**--म्हादेवराव, घ्या पेढा. सई, तूबी खा! अन् आतां वांट समद्यांसनी.

**गौराई**--खरंच? तुमी वाचून बघावं एकदां ती तार?

**ज्योति०**--बगीतलंसा? आईचं काळीज कसं येडं असतं तें! अग, सईला काय न्यारं दिसलं व्हयू तारंत? पांडुरंगा, लाज राखलीस रं बाबा या लंगड्याची! न्हाई तर आत्ताच्या परसंगानं माझा हुता त्यो पायबी न्हाईसा झाला असता! सोन्याचा दिस दावला देवानं!

**जिव०**--छोटूमलाचा पायगुन कधीं न्हव त्यो चांगला झाला आज!

**माधव०**——तो आला होता पुन्हां ?

**ज्योति०**——मरत्या पोरासाठीं तांदूळ मागायला. तुला सांगितलं न्हाई का म्हादेवराव ? ही लडाई अगदीं एळेवर आली म्हनून ? पैक्याला मॉल उरलं न्हाई आतां! लाखाचा धनी त्यो मारवाडी पर तांदळाच्या पसाभर दान्यासाठीं जिवबाचं पाय धरलं त्यानं. तुमी कांग्रीसवालं कितीबी नांव ठिवा पन पाडव्याच्या अदूगर शिमगा ह्यो झालाच पाहिजे. ही लडाई समद्या जगाला आग वाटली तरी आमां शेतकऱ्यास ती मातुर आंब्याच्या सांवलीगत गार वाटतीया.

**माधव०**— युद्धाच्या सांवल्या—केवढा विरोधाभास ! युद्धाचा वणवा——

**ज्योति०**——दुनियेला असल, आम्हास्नी न्हाई ! (आतून गोपाळरावाची रडकी हांक- अहो जिवबानाना, अहो जिवबानाना, अहो ज्योतिकाका ) का ? ह्यों कां रेकतोय् आनी ? या दिवानजी ! ( गोपाळराव व हरबा येतात) पिसाळा, तू रं का ह्येंच्यामागं ?

**गोपाळ०**——खरोखर पिसाळल्यासारखा माझ्या पाठीमागं लागलाय हा. मारवाड्याकडची माझी नोकरी सुटली नी हा आतां तालमींतलीं पोरं घेऊन माझ्या घरावर दगड फेकतोय् कालपासून. आमी काय खेडं सोडून जावं ?

**हरबा**——मंग हंसली कशाला गिळलीस गा ? ऽऽऽ

**ज्योति०**——गिळूंदे कीं लेका ! बामनाचं प्वाट भरलं. तुला पुन्याई लागली. तुला देवानं काय कमी केलंय्? एक सोडून दोन पोरं झालीं. या बामनाचाच आशीर्वाद त्यो.

**गोपाळ०**——एवढी कोण किंमत देतोय् ब्राह्मणांना ? तसं असतं तर—

**माधव०**——थांबा गोपाळतात्या. तुम्हां सर्वांना ही गोष्ट मला एकदां सांगितलीच पाहिजे. लीला मला पोटच्या पोरीहूनही प्रिय असली तरी ती माझी मुलगी नव्हे

**ज्योति०**—तर मग रं ?

**माधव०**—ज्योति, तुला आपला ज्ञानोबा आठवत असेल ?

**ज्योति०**—ग्यानू ? आपला पिंपळाखालचा ग्यानोबा ?

**माधव०**—होय. १९१० सालीं फरारी झालेला पिंपळाखालचा

ज्ञानोबा पंचवीस सालीं एका रात्रीं अचानक पत्नीसह माझ्याकडे आला. मीं त्यांना माझ्याकडे गुपचुप ठेवून घेतलं. तो अजूनही कुठल्यातरी कटाच्या भाषा बोलत होता. मीं खूप सांगून पाहिलं. त्यानं ऐकलं नाहीं. आपल्या गर्भवती पत्नीला माझ्या पत्नीच्या स्वाधीन करून तो पुन्हा असाच एकाएकीं नाहींसा झाला. यथाकाळीं ही मुलगी जन्मली. पण हिला जन्म देतांना ज्ञानोबाची बायको मात्र देवाघरीं गेली. एका फरारी क्रांतिकारकाची मुलगी म्हणून ही गोष्ट मला कधींच उघड करतां आली नाहीं. आम्हीं हिला आमची मुलगी म्हणून संभाळली. ही कथा हिलाही मी आजच सांगतों आहें. तीस सालीं माझी पत्नीही गेली. लीला आणि मी एवढंच माझं घर उरलं. मीं तिला वाढवली– शिकवली. मित्रकर्तव्य पार पाडलं. गोपाळतात्या, ती एका कडव्या मराठ्याचीच मुलगी आहे.

**गोपाळ०**––तरीच ! एरव्हीं ब्राह्मणाची मुलगी असं करतीच ना !

**गौराई**––(तिच्या गालांवरून हात फिरवून बोटं मोडीत) गुनाची माझी हिरकनी. वळणाचं पानी वळनानंच जायाचं.

**ज्योतिबा**––(आनंदानें) अरं माझ्या ग्यानुची लेक व्हवं ही ? ग्यानुबा म्हणजे आबाळा एवढ्या मनाचा मरद, तवाच ही ईज त्येच्या पोटीं जलमली. ग्यानुबा कवा भेटंल तवा भेटंल पर ही त्येची लेक तर माझी सून झाली. घेवा, काय तुझी माया. म्हादेवराव, बैरागी झालेल्या आपना तीन सौंगड्यांचा ह्यो एवढा सौंसार. सई, म्हन, म्हन या वक्ताला एकादा तुकोबारायाचा अभंग ! तेनंच हुंदे शेवट गोडवानी–

**लीला**–– उजळलें भाग्य आतां, अवघी चिंता वारली
सहजची लाभ पद्मनाभ पावला
संपूष्ट हें हृदयपेटी करुनि पोटीं सांठवूं
तुका म्हणे होता ठेवा, तो या भावा सांपडला

वंदे मातरम्